


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२७३०

वर्ष ११वे - १९३८.

अं. ४१-४२-४३-४४.

संपादक - मोहन ज्ञानेश्वर शहाणे

वर्ष ११वे अंक १ (४१) फेब्रुवारी १९३८
वर्ष ११वे अंक २रा (४२) एप्रिल १९३८
वर्ष ११वे अंक ३रा (४३) जुलै १९३८
वर्ष ११वे अंक ४था (४४) ऑक्टोबर १९३८

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]

४३

संपादक— मोहन ज्ञानेश्वर शहाणे
( सदस्य, सर्व्हेण्टस् ऑफ अिण्डिया सोसायटी )

आषाढ १८६०

वर्ष ११ वें ] जुलै १९३८ [ अंक ३

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष ११ वें ]

## अनुक्रमणिका

[ अंक ३ रा



———

यापुढील संपादकीय पत्रव्यवहार संपादकाचे नांवावर खालील पत्त्यावर करणें :—
इंडस्ट्रिअल सेटलमेंट, जळगांव (पूर्वखानदेश).

# महाराष्ट्र--साहित्य--पत्रिका

म. सा. परिषद्
अध्यक्ष
श्री. न. चिं. केळकर
कार्याध्यक्ष
श्री. वा. म. जोशी

या अंकांत स्वाक्षरीने प्रसिद्ध होणाऱ्या कोण-त्याहि लेखांतील मतांबद्दल महाराष्ट्र-साहित्य-परिषद् उत्तरदायी नाही. हे लेख चर्चात्मक दृष्टीनेच प्रसिद्ध केले आहेत.

कोषाध्यक्ष
श्री. ग. रा. गाडगीळ
चिटणीस
रा. सा. र. लु. जोशी
श्री. ना. के. बेहेरे

वर्ष ११] संपादक — मोहन ज्ञानेश्वर शहाणे [अंक ३


## मराठी भाषा : उद्गम व विकास

### ( नवीन आवृत्तीकरिता सूचना )

लेखक-- रा. दा. देसाई, बी. अे.



युत कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, अेम. अे., बी. टी., यांचा 'मराठी भाषा : अुद्गम व विकास' हा अपूर्व ग्रंथ अेम. अे.चे विद्यार्थी व अितरहि अभ्यासक अभ्यासितात. हा ग्रंथ प्रकाशित होअून पांच वर्षे झाली, तेव्हा याची दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ जवळ आली असावी. या ग्रंथांत आढळणाऱ्या चुका व दोष जर याच वेळीं दाखविले तर पुढील आवृत्तींत ग्रंथकारास त्यांचा परिहार करतां येअील या दृष्टीने ग्रंथाच्या सातव्या प्रकरणांतील कांही दोष या लेखांत दाखविणार आहे.

कोणत्याहि शास्त्रीय ग्रंथांत–विशेषतः अभ्यसनीय शास्त्रीय ग्रंथांत–भोंगळपणा, संदिग्धता, अपूर्णता, असावधानता हे दोष असतां कामा नयेत. ते दोष अपरिपक्व व श्रद्धाळू अभ्यासकांत संक्रामित होण्याचा दृढ संभव असतो. अशा ग्रंथांची रचना रेखीव, निश्चित, साधार, तर्कशुद्ध असली तरच ती ज्ञानसंवर्धनास पोषक होते.

—परस्परविरुद्ध विधानें—

या सातव्या प्रकरणांत परस्परविरुद्ध विधानें फार आहेत. अुदाहरणें—

( १ )

पृष्ठ ३२७ ओळ २३— "नामांच्या विभक्ति संबोधनासह आठ आहेत. विभक्तींच्या प्रात्ययांची विचिकित्सा पुढे केली आहे."

याविरुद्ध

पृष्ठ ३२७ ओळ २७ "मराठींत विभक्ति संस्कृतप्रमाणे सात आहेत असें मानितात... मराठींतील साती विभक्तींच्या प्रत्ययांची अुपपत्ति खालीलप्रमाणे आहे."

येथे 'आठ' आणि 'सात' यांचा मेळ कसा घालावयाचा ?. जर संबोधनासह आठ विभक्ति आहेत, तर संबोधनाच्या प्रत्ययांची विचिकित्सा कां केली नाही ?

( २ )

पृष्ठ ३२८ ओळ ३— "द्वितीया आणि चतुर्थी या दोन्ही विभक्तींचे प्रत्यय सारखेच जरी असले तरी त्यांचे 'कारकार्य' निराळे आहेत."

याविरुद्ध

पृष्ठ ३३० ओळ १०— "(प्रथमा आणि द्वितीया) ह्या दोन्ही विभक्तींत नामांचीं रूपें सारखींच होतात."

द्वितीयेचीं रूपें जर चतुर्थीसारखीं आणि प्रथमेसारखीं अशीं दोन भिन्न प्रकारचीं होतात, तर ती अेक विभक्ति कशी मानावयाची ? द्वितीयेचीं वेगळीं—स्वतंत्र रूपें आहेत किंवा नाहीत याचा निर्णय ग्रंथकाराने केलेला दिसत नाही.

( ३ )

पृष्ठ ३२९ ओळ ४— "जुन्या मराठींत प्रथमेचा अेकवचनी 'अु' प्रत्यय संस्कृत-मधील प्रथमेचा प्रत्यय जो 'विसर्ग' त्यापासून निघाला आहे."

याविरुद्ध

पृष्ठ ३३० ओळ २— "संस्कृतमधील प्रथमेच्या 'स्' प्रत्ययाचा प्रथम 'ओ' होअून नंतर त्या 'ओ'चें ऱ्हस्व स्वरूप 'अु' झालें."

संस्कृतमधील प्रथमेचा प्रत्यय 'विसर्ग' हा खरा किंवा 'स्' हा खरा ? संस्कृत व्याकरणांत प्रथमेचा प्रत्यय 'स्' असा दिलेला आहे. या प्रथमेच्या प्रत्ययापासून 'अु' निघाला आहे असें ग्रंथकार म्हणतात आणि 'ओ' झाला आहे असेंहि म्हणतात. यांपैकी खरें कोणतें ?

( ४ )

पृष्ठ ३३१ ओळ ४— "मराठींत तृतीयेचे प्रत्यय...अेकवचन–नें, एँ, ईं, शीं. अनेकवचन– नीं, हीं, ईं, शीं. अेकवचनाचे तीन आणि अनेकवचनाचे चार असे अेकंदर सात प्रत्यय आहेत."

याविरुद्ध

पृष्ठ ३३२ ओळ १९— "आमच्या मतें तृतीयेचा हा अेकवचनी 'ईं' प्रत्यय वर सांगितलेल्या 'एँ' ह्या अेकवचनी प्रत्ययाचा ऱ्हस्वोच्चार आहे."

अेकवचनाचे चार प्रत्यय देअून त्यांस तीन म्हटलें आहे. बरें हें अनवधानतेने झालें म्हणावें तर पुढे 'ईं' हा अेकवचनी प्रत्यय 'एँ' ह्या अेकवचनी प्रत्ययाचा ऱ्हस्वोच्चार आहे असें म्हटलें आहे. मग 'तीन'हें खरें किंवा 'चार' हें खरें ?

(५)

पृष्ठ ३३९ ओळ १३—"प्रत्येक विभक्तीचा कारक, अर्थ व संबंध दाखविणारे जसे प्रत्यय आहेत तसेच प्रत्येक विभक्तीचीं शब्दयोगी अव्ययें आहेत."

यावरुद्ध

पृष्ठ ३३९ ओळ १६—"प्रथमा, द्वितीया व संबोधन या तीन विभक्तींशिवाय करून बाकीच्या पांच विभक्तींचीं अव्ययें आहेत."

जर पांचच विभक्तींचीं अव्ययें आहेत तर वर 'प्रत्येक विभक्तीचीं अव्ययें आहेत' असें म्हणणें योग्य नव्हे. 'तसेच' याच्या स्थानीं 'तशींच' असें पाहिजे.

( ६ )

पृष्ठ ३४२ ओळ २४—"ह्या सर्व रूपांत अेआ, अेया, अिआ, अिया, या, आ वगैरे जीं रूपें दिसतात तीं सर्व 'ह्' (अि>अिदम्) सर्वनामापासून निघालीं असून तींच मराठीतील सामान्यरूपाच्या मुळाशीं आहेत. मराठींतील सामान्यरूप ह्यापासून निष्पन्न झालें असें आम्हांस वाटतें."

याविरुद्ध

पृष्ठ ३४६ ओळ २५—"'हा' ह्यांत 'ह' हें सार्वनामिक बीज आहे. 'ह' हें बीज अेतद् ह्या सर्वनामाचें 'अेषः' ह्या रूपापासून आलें आहे."

पुढे पुन्हा "'अिदम्' ह्या सर्वनामापासून झालेल्या अे, या, अिया, यासी...ह्या रूपांवरून मराठींतील दर्शक सर्वनाम 'हा' ह्या सर्वनामाचीं रूपें येणें शक्य आहे."

शेवटीं 'हा' हें सर्वनाम 'अेतद्' पासून आलें किंवा 'अिदम्' पासून आलें याचा निश्चय केलाच नाही. प्रथम चुकीने ऱ्हस्व 'कि' लिहून त्याचाच दीर्घ 'की' करावयाचा असल्यास ती न खोडतां पुष्कळ मुलें 'किी' अशी लिहितात तसेंच येथें झालें आहे. पण अशा लेखनाने तो ऱ्हस्व आहे किंवा दीर्घ आहे याचा निश्चय होत नाही. पेढीवर असली सुधारणा मान्य होत नाही.

(७)

पृष्ठ ३७१ ओळ १४—("करणार, देणार, घेणार) हीं 'णार' अन्तीं असलेलीं (कृदन्तें) विशेषणें असून त्यांना विशेषणाचे सर्व नियम लागतात."

याविरुद्ध

पृष्ठ ३७१ ओळ १८—"जेव्हा हीं कृदन्तें विशेषणें नसतात तेव्हा त्यांचा अुपयोग अव्ययाप्रमाणे होतो व त्यांच्यापुढे सहायकारी क्रियापद ठेविलें म्हणजे भविष्यकाळ दाखविला जातो."

वर 'णार' प्रत्ययान्त कृदन्तें 'विशेषणें असून' असें विधान करून लगेच खाली 'जेव्हा हीं विशेषणें नसतात' असें अगदी त्याच्या अुलट विधान आलें आहे.

( ८ )

पृष्ठ ३७२ ओळ २४—पुढे-तां प्रत्ययान्त कृदन्त-करितां, देतां, घेतां अित्यादि-त्वा ह्या प्रत्ययापासून राजवाड्यांनी व्युत्पादिलें असें सांगून ती व्युत्पत्ति अधिक सयुक्तिक दिसते असें ग्रंथकारांनी आपलें मत दिलें आहे.

त्याप्रमाणेच "अूं प्रत्ययान्त कृदन्त—करूं, देअूं, घेअूं अित्यादि-सुद्धा त्वानम्-तूणम्-तून-अून-अूं ह्या मार्गाने तो व्युत्पादणें ज्यास्त सयुक्तित दिसतें" असें ग्रंथकार आपलें मत देतात. आणि पुढे "ह्याचाच आणखी अेक प्रकार खालीलप्रमाणे आहे.

अून प्रत्ययान्त कृदन्त — करून–देअून–घेअून अित्यादि. हें संस्कृतमधील 'त्वा' प्रत्ययापासून किंवा त्याच्याहि मागच्या त्वान–त्वीन वगैरे वैदिक संस्कृत प्रत्ययांपासून सिद्ध झालें आहे." असें म्हणून "त्वान, त्वीन–त्वा–तूणम्–तून–अून अशा मार्गानें हा 'अून' प्रत्यय येणें शक्य आहे" असें आपलें मत देतात.

'तां,' 'तांना,' 'अूं,' 'अून' हे चारहि भिन्न अर्थांचे, भिन्न प्रयोगाचे प्रत्यय अेकाच अुगमापासून म्हणजे 'त्वा' ह्या अेकाच प्रत्ययापासून निघाले असें म्हणणें परस्परविरुद्ध नाही काय !

## —विसंगत विधानें—

पृष्ठें ३८२ व ३८३ यांत फारशी प्रत्यय लागून बनलेल्या शब्दांचीं अुदाहरणें देतांना विलक्षण विसंगतपणा केला आहे. कसा तो पाहा.

पृष्ठ ३८३ ओळ ८ "ची—(अल्पार्थे) अुदा०–सतरंची, बगीचा, चमचा."

'सतरंची' असा मराठींत मुळी शब्दच नाही. 'सतरंजी' असा शब्द आहे. शिवाय या शब्दांत 'ची किंवा 'जी' हा प्रत्यय नसून तो मूळ शब्दाचाच भाग आहे. पुढचें 'बगीचा' हें अुदाहरण मागच्याहून विलक्षण आहे. कारण त्यांत 'ची' हा प्रत्यय नसून 'अीचा' हा प्रत्यय आहे. तिसरें 'चमचा' हें अुदाहरण तर सर्वांत विलक्षण आहे. कारण यांत 'ची' हा प्रत्यय नाही किंवा 'चा' हाहि प्रत्यय नाही. 'चमचा' असाच सबंध मूळचा शब्द आहे. 'कापूस' यांत जसा 'स' हा चतुर्थीचा प्रत्यय नव्हे किंवा फुटाणे यांत जसा 'णे' हा धातुसाधिताचा प्रत्यय नव्हे, तसाच यांत चा हा प्रत्यय नव्हे. तेव्हा 'चमचा' हें 'ची' प्रत्ययान्त शब्दाचें अुदाहरण कसें होअूं शकेल ! प्रत्ययाचा अर्थ 'अल्पार्थे' असा देणें संस्कृत ग्रंथांत योग्य होय. मराठी ग्रंथांत तो शोभत नाही. या तीन अुदाहरणांत प्रत्ययान्त शब्द केवळ 'बगीचा' हाच आहे. पण त्यांत 'अीचा' हा अल्पत्वदर्शक प्रत्यय आहे, 'ची' असा नाही. बाग+ईचा=बगीचा.

पृष्ठ ३८३ ओळ ४ "गर—करणार, कर. अुदा०–कारागर, शिकलगर, सवदागर, कारीगर."

'कारागीर' या शब्दाचीं निरनिराळीं रूपें महाराष्ट्र शब्दकोशांत पुढीलप्रमाणे आढळतात.– 'कारिगर, कारिगार, कारागीर, कारेगार, कारीगर, कारीगार, कारेगर.' यांमध्ये वरील अुदाहरणांतील 'कारागर' हा पहिला शब्द मुळीच आढळत नाही. मग हा ग्रंथकारांना कोठे आढळला !

दुसरा 'शिकलगर' हा शब्द मराठींत आढळत नाही 'शिकलगार' असा आढळतो.

पृष्ठ ३८३ ओळ ९– "दान, दानी–सांठा. अुदा० पिकदाणी, कलमदान, अत्तरदाणी, गुलाबदाणी."

वास्तविक दान, दाणी ( दानी नव्हे ) हे प्रत्यय लागून स्थानदर्शक नामें बनतात. तेव्हा दान, दाणी यांचा 'साठा' असा जो अर्थ दिला आहे तो योग्य नाही. त्याचप्रमाणे अुदाहरणांचा क्रम प्रत्ययक्रमानुसार पाहिजे. अर्थात् 'कलमदान' हें अुदाहरण पहिलें पाहिजे होतें. दानी असा प्रत्यय देअून दाणी प्रत्ययाचीं अुदाहरणें देणें विसंगत होय.

पान ३८३ ओळ १२– 'नवीस–लेखक. अुदा० नकलनवीस, फडनवीस, सबनीस, जमेनीस, वाकनीस."

यांतील शेवटच्या तीन अुदाहरणांतील 'नीस' हा प्रत्यय ('नवीस'चा संक्षेप) 'नवीस' प्रत्ययापुढे द्यावयास हवा होता.

पृष्ठ ३८३ ओळ ११– "दार–अधिकारी" येथे 'अधिकारी' या अर्थाच्या स्थानीं 'राखणारा, बाळगणारा' असा अर्थ देणें योग्य होय. ओळ १४ मध्ये 'बन्द' ह्या प्रत्ययाचा अर्थ 'बांधणारा, बद्ध' हा द्यावयाचा राहिला आहे. ओळ १५ 'बाज'चा अर्थ 'सवयीचा' असा दिला आहे तो खेळणारा, रमणारा असा देणें योग्य. ओळ १७ 'अिस्तान'– संस्कृत 'स्थान' ह्या प्रत्ययासारखाच आहे. अुदा० हिंदुस्तान, अफगाणीस्तान, तुर्कीस्तान. 'अिस्तान' प्रत्यय 'हिंदु'ला लावतांना अि कोठे गेला ! वास्तविक 'स्तान' असाच प्रत्यय द्यावयास हवा होता. कबरस्तान, तुर्कस्तान, अरबस्तान. अि हा वेगळा प्रत्यय आहे.

पृष्ठ ३८२ ओळ २५– 'आन, वान–मतुव् प्रत्ययासारखा. अर्थ–'जवळ असणें.' अुदा. बागवान, गाडीवान, दारवान."

'आन' प्रत्यय प्रथम दिला असून त्याचें अेकहि अुदाहरण दिलेलें नाही. 'आन' असा प्रत्यय तरी आहे काय ! प्रत्ययाचा जो अर्थ दिला आहे तो योग्य नाही. 'वान' प्रत्यय नामाने दर्शविलेला 'व्यापार–क्रिया करणारा' असा त्याचा अर्थ आहे. बागवान= बाग करणारा–माळी, गाडीवान=गाडी हाकणारा. 'दारवान' असा मराठींत शब्द नसून दर्वान (दरवान) असा आहे व त्याचा अर्थ 'द्वारपाल, द्वाररक्षक' असा आहे. 'दार-जवळ असणारा' असा नाही. 'मतुव्'च्या स्थानीं 'मतुप्' हवा.

## —भरमसाट विधानें—

पृष्ठ ३२८ ओळ १७ "मराठींतील आकारान्त प्रतिपदिकांतील अन्त्य आ संस्कृत-मधील 'क'पासून आला आहे. अुदाहरणार्थ—घोटक–घोडओ–घोडअूं–'घोडा'. अपभ्रंश भाषेंत 'घोडअूं' ह्या रूपाबरोबर 'घोडआ' हेहि रूप प्रचारांत होतें. त्या प्रत्ययापासूनच मराठी 'आ' अुत्पन्न झाला आहे. 'एँ' हा प्रत्ययहि वरील 'आ' प्रत्ययाप्रमाणे संस्कृत 'क' ह्या प्रत्यया-पासूनच निघाला आहे. अुदा०—कदलकम्–कयलय–कअिलयं–केलयं–केलअिं–केळें".

ही अुपपत्ति सर्व प्रातिपदिकांस लागू होणार नाही; कांही थोड्या प्रातिपदिकांस लागू होअील. अुदाहरणार्थ गर्भ–गाभा, झर–झरा, घट–घडा, आम्र–आंबा, चतुष्पथ–चव्हाटा–चवाठा, गोष्ठ–गोठा, सरट-सरडा, मत्स्य–मासा, दण्ड–दांडा, दीप–दिवा, कूप–कुवा, द्विगुण-दुणा नव–नवा, दोहद–डोहळा–हाळा, द्यूतकार–जुगाऱ्या, पारद–पारा, पंजर–पिंजरा, मातुल–मावळा, योग्य–जोगा, सत्य–साचा, श्याल–साला अित्यादि सर्व शब्दांतील आ हा काय 'क' प्रत्ययापासून उत्पन्न झाला असें मानावयाचें ! आणि तसें मानण्यास आधार काय ! तेव्हा घडा हा आकारान्त शब्द घटः ह्या संस्कृत प्रथमान्त पदापासून बनला आहे असें मानणेंच सयुक्तिक होय. त्याचप्रमाणे वलय-वळें, प्रवालं–पोवळें, ताम्र–तांबें, रूप्यं–रुपें, संकटं–सांकडें इत्यादि एँकारान्त रूपें 'क' प्रत्ययाच्या मध्यस्थीवाचून बनलीं आहेत हें अुघड आहे. अर्थात् वरील विधान समर्याद करावयास पाहिजे.

पृष्ठ ३३० ओळ १४– "'कर्म' हा कारकसंबंध अेखाद्या शब्दाचा त्याच वाक्यांतील क्रियेशीं आहे असें म्हणावयाचें आणि त्या शब्दाची विभक्ति मात्र प्रथमा मानावयाची हें असंगत व अशास्त्रीय नाही का ! वाक्यांत अेखाद्या शब्दाचा क्रियापदाशीं 'कर्म'कारकाचा

संबंध असला की तो शब्द द्वितीया विभक्तींतच असला पाहिजे, मग त्याला प्रत्यय लागो किंवा न लागो."

या छातीठोक विधानाचें खंडन मोरो केशव दामले यांनी आपल्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणां'त पूर्वीच केलें आहे. अमक्या कारकाला अमकी विभक्ति असलीच पाहिजे ही गोष्ट अुघडअुघड असिद्ध आहे. अुदाहरणार्थ 'कर्ता' हा कारकसंबंध प्रथमा, तृतीया व चतुर्थी या तीन वेगवेगळ्या विभक्तींनी दर्शविला जातो. कारकावरून विभक्ति ठरवावयाची असा जर ग्रंथकारांचा आग्रह असेल, तर अुपपद विभक्तीची वाट काय ? पण येथे दामल्यांच्या व्याकरणातील संक्षिप्त उतारा देणे समर्पक होअील.—"तेव्हां 'रामास' कर्मार्थी द्वितीया आणि संप्रदानार्थी चतुर्थी, आणि 'राम' ही कर्त्रर्थी प्रथमा व कर्मार्थी द्वितीया आणि कर्मणि प्रयोगांत कर्मार्थीही प्रथमाच असें सांगणाऱ्यास विभक्तीचा मूळ अुद्देशच काय हें समजत नाही असें म्हणणें भाग आहे. अेवंच प्रत्ययांवरून विभक्ति मानाव्या कीं अर्थावरून विभक्ति मानाव्या हा प्रश्न जो विचारतो, तो अेकंदरींत शास्त्राचें साधारण स्वरूप व व्याकरणविवेचनाची शास्त्रीय पद्धति ह्या गोष्टींबद्दलच्या आपल्या शोचनीय अज्ञानाचें जणुं कांही हास्यास्पद प्रदर्शनच करतो हें निर्विवाद आहे. सारांश, **विभक्ती ह्या प्रत्ययांवरूनच मानिल्या पाहिजेत.**" (शा. म. व्या. पान ३४१. शिवाय पान ६७८–७९ पाहावें.) ग्रंथकाराने पान ३३४ मध्ये केलेलें पुढील विधान त्याच्याविरुद्ध जातें. "प्राकृतमध्ये चतुर्थीचा लोप झाला आणि चतुर्थीचा अर्थ द्वितीया आणि षष्ठीच्या साहाय्याने दाखविला गेला." 'संप्रदान' हा कारकसंबंध दर्शविणारी विभक्ति चतुर्थीच असली पाहिजे असें कां म्हणूं नये ? तिला द्वितीया व षष्ठी कां म्हणावें ?

पृष्ठ ३३७—"षष्ठीचे प्रत्यय १ चः— षष्ठी विभक्ति विशेषणस्वरूप असल्यामुळे विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणे हा 'च' प्रत्यय बदलावा लागतो. अुदा०— चा, ची, चें (अे. व.); चे, च्या, चीं (अ. व.) हे प्रत्यय **नामास** लागतात."

जर नामासच लागतात तर मग त्याचा, त्यांचा, ज्याचा, ज्यांचा, ह्याचा, ह्यांचा, कोणाचा हीं रूपें सर्वनामांवरून कशीं बनलीं ? 'च' हा षष्ठीप्रत्यय लागून बनलेलें रूप जर विशेषणस्वरूप आहे, तर तें अकारान्त विशेषण चा, ची, चें, चे, च्या, चीं असे विकार कसें पावतें ? गोड आंबा–आंबे–चिंच–चिंचा–बोर–बोरें. येथे गोड हें अकारान्त विशेषण लिंगवचनानुसार न बदलतां अविकृतच राहतें. मग षष्ठीचा प्रत्यय 'च' असा ग्रंथकार कसे देतात हें समजत नाही. त्याचप्रमाणे 'झ' असा षष्ठीचा प्रत्यय देअून "कांही सर्वनामांना झा, झी, झें हे प्रत्यय लागतात, अुदा०—माझा–झी–झें, तुझा–झी–झें" असें ग्रंथकार म्हणतात. पण ह्या रूपांत 'झ' हा प्रत्यय मुळी आहे काय ? प्राकृतांत 'अस्मद्' व 'युष्मद्' यांचीं षष्ठीचीं अेकवचनी रूपें मज्झ, मह व तुज्झ, तुह अशीं होतात. त्यावरूनच माझा, माहा ( वऱ्हाडांत ), तुझा, तुहा ( वऱ्हाडांत ) अशीं मराठी रूपें बनलीं हें अुघड दिसतें. ह्यांत 'झ' किंवा 'ह' हा स्वतंत्र प्रत्यय नाही.

पृष्ठ ३३८ ओळ २०—"वाक्यामध्ये नामाचा नामाशीं जो संबंध असतो तो दाखविणाऱ्या विभक्तीस अुपपद विभक्ति म्हणतात."

हें जर खरें मानावयाचें तर 'पायाने लंगडा', ' बुद्धीने मंद ', 'स्वभावाने तापट' ह्या अुदाहरणांत लंगडा, मंद, तापट हीं काय नामें मानावयाचीं ?

पृष्ठ ३७१ ओळ १४—"वर दिलेला जो 'तृ' प्रत्यय आहे त्याच्याअैवजी 'णृ' हा प्रत्यय लागून (करणार, देणार, घेणार) हीं 'णार' प्रत्ययान्त कृदन्तें बनलीं आहेत."

हा 'णृ' प्रत्यय संस्कृतांत नाही. आणि हा कोठून आणला तेंहि सांगितलें नाही. 'तृ' प्रत्यय लागून जशीं 'करता, देता, मारता हीं आकारान्त कृदन्तें बनलीं आहेत तशीं 'णृ' प्रत्यय लागून करणा, देणा, मारणा अशीं आकारान्त कृदन्तें बनलीं पाहिजेत. मग तीं करणार, देणार अशीं 'णार' प्रत्ययान्त कशीं बनलीं तें सांगावयास नको काय ?

पृष्ठ ३७२ ओळ ८—"दुसरा जो 'अनीय' म्हणून संस्कृतमधील विध्यर्थाचा प्रत्यय आहे त्यापासून मराठी विध्यर्थी कृदन्त 'णें' कारान्त सिद्ध होतें. संस्कृत 'अनीय' प्रत्यय प्राकृत-मध्यें अणिय आणि मराठींत 'णें' होतो. लिहिणें, करणें, देखणा. अुदा०—हें काम मला करणें आहे. बहुत काय लिहिणें, देखणा मनुष्य."

सर्वच मराठी वैयाकरण हीं 'णें' कारान्त क्रियावाचक नामें संस्कृत 'अन' प्रत्ययापासून व्युत्पादितात. अुदा०—अुत्पाटनं—अुपटणें, जेमनं—जेवणें, दंशनं—डसणें. हीं क्रियावाचक नामें कवितेंत व क्वचित् गद्यांतहि कधी कधी विध्यर्थक क्रियापदाप्रमाणे वापरतात. ही व्युत्पत्ति अगदी साहजिक आहे. असें असतां 'णें' प्रत्यय विध्यर्थक 'अनीय' प्रत्ययापासून व्युत्पादण्यास तसेंच सबळ कारण द्यावयास पाहिजे होतें आणि वरील व्युत्पत्तीचें खंडन करावयास पाहिजे होतें. शिवाय अुदाहरणें देण्यांतहि औचित्य नाही. ' लिहिणें, करणें' या ' णें ' प्रत्ययान्त कृदन्ताच्या जोडीला 'देखणा' हें कृदन्त कसें बसतें तें ग्रंथकारांनी दाखवावयास हवें होतें.

—चुकीचीं विधानें—

पृष्ठ ३४८ ओळ १२– "'कांही' हें प्रश्नार्थक विशेषण आहे." 'कांही' हें विशेषण प्रश्नार्थक असल्याचें कोठेच दिसत नाही.

पृष्ठ ३४३ ओळ २६- "अर्धमागधी, जैनमागधी" ह्या दोन भिन्न नसून अर्ध-मागधी म्हणजेच जैनमागधी होय.

पृष्ठ ३३५ ओळ २३- 'पुत्तातोँ' असें दिलें आहे. पण पुत्तत्तो असें खरें रूप आहे.

—उसनीं विधानें—

पृष्ठ ३३७ ओळ २१– "'अीय' ह्या संस्कृतमधील तद्धित प्रत्ययापासून हा प्रत्यय ['च'] आला आहे असें आमचें मत आहे." परंतु हें मत कृष्णशास्त्री गोडबोले यांनी आपल्या व्याकरणांत पूर्वीच दिलें असल्यानें व दामल्यांनी त्याचा अनुवाद केला असल्याने तें "आमचें मत" असें ग्रंथकारांनी म्हणणें योग्य कसें होअील ?

पृष्ठ ३७४ ओळ ११—"त्वा—तून—हून—अून (माहाराष्ट्री) या मार्गानेहि मराठी 'अून प्रत्यय निघेल." पण ही अुत्पत्ति कृष्णशास्त्री गोडबोल्यांनी पूर्वीच दिली असल्याने तिचा अुल्लेख करून ती देणें योग्य झालें असतें.

किरकोळ—'सहायकारी' असा शब्द बहुशः सर्वत्र वापरला आहे. त्या ठिकाणीं 'साहाय्यकारी' किंवा 'सहाय' क्रियापद असा शुद्ध शब्द वापरावयास हवा होता.

---

चर्चा

# म्हणींविषयी खुलासा



मागच्या म्हणजे अेप्रिलच्या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकांत मीं ज्या म्हणी दिल्या आहेत त्यांपैकी कांहीच्या अर्थासंबंधी मजकडे श्री. नारायण गोविंद चापेकर यांनी बदलापूराहून जो खुलासा पाठविला आहे तो मजप्रमाणे अितरांसहि विचारप्रवर्तक होअील असें वाटल्यावरून खाली देत आहें.

"अेप्रिल महिन्याचा साहित्य पत्रिकेचा अंक वाचीत असतां आपल्या म्हणी पाहिल्या. त्यांपैकी नं. ३९७च्या म्हणीचा अर्थ आपण बरोबर दिला नाही असें वाटतें. 'वाकड्या मेढीला वाकडा दर' यांत दर म्हणजे किंमत नाही, तर दर म्हणजे खळगा असा अर्थ आहे. अथवा कुणब्यांच्या भाषेंत विशेष वापरण्यांत येणारा शब्द म्हणजे 'नेम'. वाकडी मेढ असली म्हणजे ती पुरण्याकरिता जमिनींत दर काढावयाचा तो वाकडा काढावा लागतो. 'वाकड्या मेढीला वाकडा दर' म्हणजे 'जशास तसें'. दुसरा मनुष्य वाकड्या रीतीने वागेल तर आपणांसहि वाकडेंच वागलें पाहिजे; सरळ वागून चालणार नाही. येथे किंमतीचा कांही संबंध नाही.

याच्या पुढच्या म्हणीमध्ये, 'ठिकाण नाही लग्नाला अन् कोण घेअील मुलाला' 'मुलाला' याच्या अैवजी 'मुलीला' हा शब्द अधिक बरा. कारण गौरीहाराजवळ मुलीला कडेवर घेऊन तिचा मामा नेअून ठेवितो ह्या वहिवाटीस अुद्देशून ही म्हण पडली असावी.

यानंतर म्हण नंबर ४०६. 'नांव नाबरांचें सुख मातबरांचें' याचा आपण दिलेला अर्थ : गरिबांच्या नांवावर केलेल्या योजना श्रीमंतांच्या सुखासाठी असतात मला पसंत पडत नाही. नाबर हें आडनांव आहे. याचा अर्थ गरीब. गबर याच्या अुलट नाबर. म्हणून नांव जरी नाबर असलें तरी सुख मात्र श्रीमंतीचें मिळतें असा त्याचा अर्थ आहे.

बदलापूर, १४ मे ३८ नारायण गोविंद चापेकर"

टीप— 'दर' शब्दाच्या अर्थासंबंधी प्रा. वामन मल्हार जोशी, श्री. यशवंत गणेश फफे आणि श्री. कृष्णाजी गोविंद किनरे ह्यांनीहि माझी चूक निदर्शनास आणली ह्याबद्दल मी त्यांचाहि आभारी आहें.

पुणें, ८ जून ३८ नीळकंठ शंकर नवरे

अनुक्रमणिका

# कुडाळी म्हणींची चर्चा : आक्षेपांस अुत्तर

लेखक— बाळकृष्ण रामचंद्र प्रभु, बी. अे.

श्री. वर्दे यांनी पत्रिकेच्या ४२ व्या अंकांत पुढील कुडाळी म्हणींवरील 'कुडाळी' हें नांव रूढ होतें किं नाही व ते युक्त आहे की नाही या घेतलेल्या आक्षेपास तो मुख्य व महत्त्वाचा आक्षेप असल्यामुळे संपादकांच्या नांवें पत्र लिहून साधार अुत्तर दिलें आहे. आता त्यांच्या अितर गौण आक्षेपांकडे वळतों.

(१) म्हण ४ वरील आक्षेप:—या म्हणींत 'बामणदंड' या आसुरी कराचा संबंध कसा येतो ! बामणदंडाचा संबंध सर्व म्हणीच्या अर्थाशीं मीं जोडलेला नाही. बामण हा शब्द विशिष्ट ज्ञातीस त्या प्रांतीं कसा लागतो, हें त्या प्रांताबाहेरील लोकांस साधार कळावें व श्री. वर्दे यांच्याप्रमाणे त्यांनी आधार विचारूं नये म्हणून लिहिलें आहे. 'कुडाळी' हें नांव सरकारमान्य कसें हें तेच विचारतात, व 'बामण' या शब्दास कागदोपत्रीं आधार दिला किं त्याला असंबद्ध प्रचार म्हणतात !

(२) म्हण ५ हिचा संबंध लक्षाधीश टोपीवाल्यांशींच केवळ लावला नाही तर कुडाळदेशकार ब्राह्मणांतील पांच देसाअी घराणीं यांना लावला. रूढीचा श्री. वर्दे यांनी दिलेला अर्थ हा मला त्या म्हणीचा लक्ष्यार्थ म्हणून मान्य आहे. पण त्या म्हणीचा वाच्यार्थ रूढ होण्यास कोणते तरी देसाअी लागतील, व ते खरेखुरे देसाअीच असतील. म्हणून जे देसाअी ऱ्हास पावले त्यांना अनुलक्षून ही म्हण रूढ झाली, व तिचा वाच्यार्थ देसाअी यांस लागतो.

''देसाअी' हें नांव कुटुंबाच्या श्रीमंतीचा लौकिक दाखवितें'' असें श्री. वर्दे म्हणतात. देसाअी हें श्रीमंतीचें व लौकिकाचें दर्शक नसून, मुख्यत: तें सत्तेचें निदर्शक आहे. ''मालवण गांवांत कांही पुरातनची अिनामत अद्याप चालली आहे व......माहाराज यांणी संदा दिल्या आहेत, त्यांतहि आमचे वडिलांस देसाअी, प्रांत कुडाळ असें लिहिलें आहे'' असें गणेश प्रभु देसाअी म्हणतो. ''देसाअी, प्रान्त कुडाळ'' हे शब्द अधिकाराचे निदर्शक आहेत. कुडाळांत सर्वांत श्रीमंत किंवा कुडाळांत प्रसिद्ध अशा अर्थाचे निदर्शक नाहीत. (मठ गांवचा शिलालेख परिशिष्ट लेखांक १८ पाहा.) देसाअी याचा चुकीचा अर्थ श्री. वर्दे रूढ करतात; म्हणून त्यांना असंबद्ध वाटणारा अैतिहासिक कागदोपत्रांचा अुल्लेख करावा लागत आहे.

(३) म्हण ६ ही अेकवचनाप्रमाणे अनेकवचनी अुच्चारलेली मीं अैकली आहे. कै. परुळेकरांनीहि माझ्याप्रमाणेच अैतिहासिक संबंध आणला आहे. पण तो श्री. वर्दे दृष्टिआड करतात. तसेंच कै. परुळेकरांच्या पुस्तकाचा निर्देश ते मोघम करतात. ''परुळेकरकृत अितिहास पाहा'' म्हणजे कोणता ! अेखाद्या नागपूरच्या वाचकाने कुठचा अितिहास पाहावा ! बरें, पान कोणतें ! कै. परुळेकर यांचें संपूर्ण नांव गणेश मुकुंद परुळेकर असें आहे, व

त्यांच्या पुस्तकाचें नांव "कुडाळदेशकर किंवा दक्षिणेंतील आद्यगौड ब्राह्मण" असें आहे. त्याचें पान ११७ पाहा. श्री. वर्दे यांना असें करण्याचें कारण कुडाळदेशकर ब्राह्मणांविषयी व त्यांच्या अितिहासाविषयी श्री. वर्दे यांच्या मनांत असलेली अढी होय.

(४) म्हण १ वरील आक्षेपास अुत्तरः— 'करा' हें मातीचें तांब्याअेवढें भांडें असें म्हणणें हें "पाण्याचें लहान मडकें" या अर्थापेक्षा चांगलें. मडकें या शब्दांत अेक प्रकारची हीनता आहे. तसेंच करा हा व्रतबंधाच्या वेळीं व विवाहाच्या वेळीं वापरतात. म्हणून त्या शब्दांत पावित्र्याची अेक व शुभत्वाची एक अशा मिश्र छटा आहेत. म्हणून मीं वर सामान्य अर्थ दिला आहे.

'धू' हा शब्द 'दुहिता' अर्थ व्यक्त करतो. पण पूर्वीची बालविवाहाची चाल ध्यानांत घेतली, तसेंच श्री. वर्दे यांना वधूशीं कन्याचा संबंध असतो हें मान्य आहे हें ध्यानांत घेतलें तर 'धू' याचा अेक अर्थ 'वधू' असाहि होअू शकतो.

(५) म्हण २ वरील आक्षेपः—'पदर' याचा वाच्यार्थ अुपरण्याचाच पदर होअील. श्री. वर्दे यांनी दिलेला अिष्टार्थ (लक्ष्यार्थ !) मला मान्य आहे.

(६) म्हण ७ वरील आक्षेपः— साधी आंघोळीची जागा व माडाजवळची न्हाणी यांत फरक आहे. साध्या जागेचें पाणी वाहतें. पण माडास आळें असल्यामुळे पाणी जास्त सांचतें व चिखल जास्त कुचकट वाटतो. म्हणींतील अर्थाची तीव्रता माझ्या, श्री. वर्दे यांस वाटणाऱ्या व्याख्यानाने मीं स्पष्ट केली आहे.

(७) म्हण ८ वरील आक्षेपः— या म्हणीच्या अर्थाची ग्राम्य म्हण श्री. वर्दे यांस वेळेवर आठवली याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

(८) म्हण ९ वर श्री. वर्दे यांनी पुरवणीदाखल-आक्षेप नव्हे-केलेलें विवेचन मला मान्य.

(९) म्हण १० वरील आक्षेपः— श्री. वर्दे यांनी सुचविलेल्या 'दावली' हा शब्द मीं अेकलेला नाही. त्यांनी निर्दिष्ट केलेल्या वस्तूचें नांव 'डवली' असें मीं अेकलें आहे. डाव मीं स्वतः पाहिला आहे, व तिचें वर्णन मीं दिलें आहे.

(१०) श्री. वर्दे यांचा बहुश्रुतपणा दिसला. पण तो या म्हणीशीं असंबद्ध. कारण मांजर हें खावयाचा पदार्थ मागतांनाच अगर प्रेमाने पायांस अंग घासतें. अिजिप्शियन समज कुडाळ प्रान्तांत रूढ नाही. अुलट मांजर आडवें गेलें तर अशुभ मानतात.

(११) 'सवकणें' हा शब्द सवअी या नामावरून अगर 'सवय' या नामावरून धातुरूप बनला असा माझा तर्क आहे. 'चट लागणें' हा अर्थ व्युत्पत्ति न शोधल्यास ग्राह्य आहे.

(१२) 'जवादयां' या शब्दावरील माझें 'व्याख्यान' व श्री. वर्दे यांची सुसंबद्ध व मर्यादित चर्चा चूक. कारण 'जवादयां' याचा अर्थ निराळा आहे. घोरपड याला 'जिवाद' असा शब्द आहे. मीं 'जिवाद' यांचें वर्णन अैकून, माझ्या अैकीव माहितीने विवेचन केलें. पण श्री. मुरारी रघुनाथ प्रभु, मु० झाराप (सावंतवाडी), हे कळवितात की 'जवादयां' हें एका चतुष्पाद प्राण्याच्या वृषणाचें नांव आहे. व त्या वृषणाचें तेल देशींस औषधी म्हणून वापरतात. तसेंच तो खाद्यांतहि अन्तर्भूत होतो. म्हणून अप्रयोजक अुपयोग असा म्हणींतून ध्वनि निघतो.

(१३) म्हण २६ मधील गोष्ट त्यांना मान्य आहे. फक्त माझ्यापेक्षा अर्थाबद्दल जास्त चर्चा केली आहे. मीं 'मूर्खपणा' म्हटलें. ते 'मिजास' म्हणतात. मिजाशीच्या मुळाशीं मूर्ख-पणाच असतो. त्याची विशेष चर्चा ग्राह्य.

(१४) म्हण ३०. माझ्या अर्थात व विरोधकांच्या अर्थात फरक नाही असें मला वाटतें.

(१५) त्या प्रान्तीं 'दुष्काळ' व 'डुकळ' हे दोन्ही शब्द परिचित आहेत. 'कुडाळी' अैवजी 'कोंकणी' वापरून श्री. वर्दे यांनी अतिव्याप्तीचा दोष पत्करला आहे.

(१६) म्हण ४६ मध्ये 'अुपाय' अगर "वखेद" असा शब्द मीं अैकला आहे. मीं मालवण, वेंगुर्ले, सावंतवाडी, कुडाळ यांत अेकसारखीं २० वर्षे घालविलीं आहेत. मीं 'ओखद' हा शब्द तिकडे मुळींच अैकला नाही. श्री. वर्दे यांनी अैकला असल्यास तोहि वापरावा.

(१७) 'लिनां' हा शब्द मीं अैकला आहे; व तो म्हण ५० मध्ये प्रासाला जुळतो.

(१८) म्हण ५२ वरील आक्षेपास अुत्तरः— सापाला वैद्य व मांत्रिक यांशिवाय कोणी धरीत नाहीत. अितर लोक तो न धरतां दंडुक्याने बडवतात. खेकडे मात्र जास्त लोक धरतात. तसेंच खेकडा हा भोज्य पदार्थ असल्यामुळे त्याला धरण्याचा मोह मांसाहारी लोकांस सार्वत्रिक असतो, व खेकडे धरण्यांत अनभिज्ञ असणाऱ्यांस बिळांत हात घातल्यावर तो भोवतो. समुद्र-कांठच्या खेकड्यांविषयी कदाचित् असें म्हणतां येत नाही. पण ओहोळ व नदींत पुराच्या वेळीं "शेळकाठी" घेअून व अितर वेळीं डोह अुपसून खेकडे धरण्याची पद्धत पाहिली तर ही म्हण खेकड्यावरून रूढ झाली असें वाटतें.

(१९) म्हण ५०. अज्ञ माणसें मुलांस पुष्कळ अन्न देतात; 'खा, खा' असा आग्रह करतात. पण कित्येक मुलें क्षीण होतात. ह्यावरून निगा व प्रकृति यांचा संबंध विपरीत अर्थाने तरी आहे असें वाटतें.

(२०) म्हण ५७ चा अर्थ सुखवस्तू व मुलींची आबाळ न करणाऱ्या नागर कुटुंबास लागेल. पण पंचा नेसणाऱ्या अगर फडका पेहेरणाऱ्या मुली आईचें "मुंकलें" अगर नथ, अगर 'गळेश्री' मागतात. म्हणून मीं सुचविलेला अर्थ जास्त ग्राह्य आहे. पांढरपेशा वर्गास वर्दे यांचा अर्थ लागू होअील.

(२१) म्हण ६४ च्या प्रारंभीं 'ब्रोकडाक' हा शब्द मीं ऐकलेला नाही. तसेंच शेवरी ही छोटी वनस्पती मृगाच्या आरंभीं उद्भूत होते. ती माझ्या पाहण्यांत आहे. पाअूस अुशिरा पडला तर ती कुजते. शेवटीं ही दुसरी वनस्पती केवढी असते, तिला वर्षभर पालवी असते कीं नाही, हें श्री. वर्दे यांनी जास्त वर्णन देअून स्पष्ट केलेलें नाही.

(२२) म्हण ६५ कोंकणी नवरे सरसहा "कजाग व कडक" असा श्री. वर्दे यांनी सिद्धान्त ठोकून दिला आहे. जणुं काय कोंकणांत बावळट नवरे नाहीतच. आर्थिक परिस्थिती-मुळें कष्ट सोसावे लागतात असें श्री. वर्दे यांना कबूल असावें असें त्यांच्या चर्चेचें धोरण दिसतें.

(२३) म्हण ६९ मध्ये 'गोदलां' (गोदा), 'भागलां' (भागू, भागा) व "साळग्यां" असे तिन्ही शब्द वापरतात. 'साळ्यां' हा मुद्रण दोष आहे.

(२४) म्हण ७०. वाड = अुंसाचा शेंड्याकडचा बेचव तुकडा. श्री. वर्दे यांनी आपल्या अर्थात 'बेचव' हा शब्द घुसडल्यामुळें पुढचें विवेचन त्यांनी केलें. उसाचे लावण्यासाठीं जे शेंड्याकडचे तुकडे करतात, त्यांस 'वाडा' म्हणतात. तसेंच तुलसीविवाहाच्या वेळीं लांब शेंड्यासह अूस आणतात. त्यालाहि वाड म्हणतात. तुळसीविवाहासाठीं 'वाड' शोधणारा अुसळांत गेल्यास तोहि अेखादे वेळीं 'वाड' शोधील—कारण सरळ व सुंदर 'वाड' असावें. हें त्याचें मूळ असावें. ही म्हण फाजील चिकित्सा करणाऱ्या गिऱ्हाअिकाला लावलेली अैकूनच तसा निर्देश केला आहे.

---

# नन्दनवनवर्णन

## नष्टनंदन सर्ग ४

लेखक — ना. ग. जोशी (भारती विद्यालय, गोलवाड, खाडिया, अहमदाबाद)

[स्वगत संपवून 'सैतान' अुद्यानाच्या समीप येतांच त्याला विस्मयकारी वनश्रीचें अनपेक्षित दर्शन घडतें. आणि मग त्या नवीन निर्मितीचें संपूर्ण अवलोकन करण्यासाठी तो "जीवनवृक्षा"वर बसतो नि तिथूनच मानवयुग्मासह सर्व सृष्टीचें तो निरीक्षण करतो, अित्यादि भाग खालील ओळींत समाविष्ट झाला आहे.]

-----अैसें जैं वदत, तदा अुमटवी छटा
प्रतिविकार मुद्रेवर, बदल तीनदां :
फिकट क्रोध, मत्सर अन् पूर्ण निराशा
विघडविला ज्यांहीं अुसनाच भाव, नी
अुघडकीस आणियलीं कृत्रिमता, जी
त्या दिसेल, जो समर्थ. तत्कारण कीं
दिव्यमनें असल्या दुर्वृत्तिपासुनी
असति सदा मुक्त. ध्यानिं येअुनी असें
क्षोभ सकल सांतविला बाह्य शांतिने,
त्या वंचक लुच्च्याने; तो, पहिलाच
साधुवेषिं भोंदुपणा आचरणारा,
दीर्घद्वेष लपवितसे सूड घ्यावया :
परि तितुका नच बनीव, फसविण्या तया
यक्ष-युरायेसी जो पूर्वसूचित,
तद्दृष्टि पाठलाग करित तयाचा
त्यामार्गें, आणि असीरीयपर्वतीं
देखियलें त्या विरूप, विद्रुप जितुका
पुण्यवन्त यक्ष कुणिन, भीषण त्याचे
हावभाव प्रेक्षिले, तशाच भ्रमिष्ट
मुखचेष्टा. अेकटा तदा (नि मानिल
जेवि तयें) अनिरीक्षित आणि अदृष्ट.
अैशी प्रगती चाले, आणि पातला

अमरोद्यानोपकंठिं, रुचिर "नंदन"
जेथुन अतिजवळ हरिद्मुकुटशोभित,
जेंविं वन्यडुंगशोभि सम-अधित्यका (अुंचवटा)
रुढजटाजालजटिल भयदाकारी
आणिक अुन्मत्त, जेथ गमन शक्य ना,
गहन-विपिनगर्भि असें पार्श्व तयाचें—
माथ्यावरि अतिवाढे अतुल-तुंगशा
अुंची सच्छाय-देवदारु-खदिर-वा-
साग, झांप डुलते ज्या हस्तसे तयां
ताडांची; वन्य दृश्य हें, अर्णा जधी
रांगा अुंचावतात, अेक साअुली
साअुली वरून दुज्या, वन्य रंगभू
राजविभव दर्शनीय. परि अुच्चतरा
तुंगाग्रांहुनि हिरवी नंदनभिंत
ठाके अुभि, जींवरुनी पूर्व-पित्यासी
लाभे सुविशाल दृश्य खालि पसरल्या
राज्याचे; भंवतीं, अति-निकटवर्तिनी
आणि अुंच भिंतीहुनि वर्तुलपंक्ति
अत्युत्तम वृक्षांचीं, सुभगफलभरें
नमित जे, फळें-फुलेंहि अेकाकार
स्वर्ण-वर्ण-रुचिर दिसति सुभगमिश्रणें
रंगांच्या आनंदी-बिनघोटितशा:
जींवरती दिनकर करि अधिकानंदें
करस्पर्श, जितुक्या करि आनंदाने
सुंदरसंध्याभ्रपटलिं अिन्द्रचापिं वा
जेव्हा करि अीश भूमिवर्ष त्याहुनी;
-अितुकें ते मोहक भू-दृष्य वाटतें
विमलवायु अधिकविमल स्पर्शि पिशाच्चा,
जो वह्नतो सन्निध नी हृदयिं प्रेरतो
वासंतिक परमहर्ष, खेद-हारि तो
सकल, निराशा न मात्र! वाहतो अता
मन्द अनिल गंध-पंख विझुनी तदा
करित दूर तेथीचा अुग्रवास, अन्

अनुक्रमणिका

कुजबुजतो, 'कुठुनी ती लुटुन आणिली
मधुशीतल लूट'. जशी, जलपर्यटनीं,
प्रवाश्यार्थ, आशा-भूशिरपलीकडे
मोझांब्रिकपार, जलधिमार्जि वाहितो
'गंध सेबियन समीर अीशान्येचा,
गंधद्रव्ययुक्त किनाऱ्यावरून, त्या
पुण्य (अरब) अर्वदेशींच्या, लेपनें परी
हृष्ट पथीं रेंगाळति आणि योजनें
फुल्लवृत्ति तैं कृतज्ञगंध करित, जो
पसरेच पुराण महासागर हंसतां.
तृप्त असा गंधमयें मधु-द्रव्यांनीं
तो पिशाच्च आला जो शापरूपसा,
जरि त्यानीं तुष्ट अधिक अस्मोडूस्-हुनी,[२]
हुंगतांच मत्स्यगंध, दूर ओढि जो
आषक जरि, टॉबिटसुतपत्निपासुनी
आणि अधिकरोषानें धाडिजो तया
मीडियेहुनी लगेच मिसरदेशिंच्या
मरुभूमिंत, पूर्णबद्ध साखळदंडें.
चढणचढे तुटक अुम्या टेंबिची अतां
सैतान विचारातुर आणि हळुहळु;
परि पुढें न मार्ग; गहन अितुकि गुंतली,
अेक लांब कुंपणि जाशि, वाढ खुरटिशी
रोपें अन् झुडुपांच्या जाळयांची कीं,
घोटळते वाट तेथ मनुज मृगें वा
यांची, जे जातयेत त्या वाटेनें ?
अेकटेंच दार तिथें पूर्वाभिमुख
पलिकडेस; प्रमुख-गुन्हेगार बघुनि तें,
खरें द्वार धिक्करी, नी तिटकाऱ्यानें
अेक सान अुडित पार तट वलांडतो

---

१ शेबा=येमेन, तांबड्या समुद्राच्या तीराचा दक्षिण अरबस्थानाचा भाग.

२ हा बाबिलोनियन दैत्य टोबियस-टॉबिटचा पुत्र-याच्या 'सरा' नामक प्रेयसीवार लुब्ध होता. पण यक्षराज राफेल यानें त्याला जळत्या मत्स्यांच्या गंधानें भुलवून दूर घालविलें.

टेंकडि नी अुंच भिंतिचा, नि आंत तो
हळु टेकी पाय;- जसा वृक भक्ष्यार्थी,
ज्यास भूक भटकवि नव भक्ष्य शोधण्या,
लक्षि, कुठें राखि कळप धनगर सांजे
बंद कवाडात शेत राखिव जेथें,
अन् कुसवांतुन अुडि घे सहज कवाडीं;
वा जैसा चोर सिद्ध लुटण्या पैका
कुणि धनीक शेठींचा, जड दरवाजे
अडसर–कडि–बद्ध, डर न हल्याची ज्यां,
परि वारींतून रिघे, कौलांतुन वा;
तेंवि चढे चोरोत्तम देवकवाडीं—
तेंवि तदाप्रभृति धर्ममंदिरांतरीं
विषय-पंक-कृमि चढती तेथ पगारी.
तेथुनि वरि अुडतो, नी **जीवन**वृक्षीं,
मध्यवृक्षिं, सर्वतुंग वाढत जो तै,
वसला तिथ जलगृध्रच, परि हृद्शांति
त्यामुळें मिळेन, तरी योजित बैसे
सजीवार्थ मृत्यु; ना गुणक्षिती तया
जीवनझर वृक्षाची, मात्र लाभ घे
दृष्टिक्षेपार्थ दूर, सदुपयुक्त जो
अमरजीवनाचा पण साच. माहिती
अितुकी ना कोणासी ( अीश केवळ
अपवादा ), हितकर जें पुढतिं अुभें त्या
योग्य मूल्य द्यायाची, परि अलटाच
अत्युत्तम गोष्टींचा दुरुपयोग तो
करि अतीव किंवा अतिनीच लाभ घे.
खालिं अतां नवविस्मययुक्त निरीक्षी,
आविष्कृत मानवसंवेदनासुखा
सान स्थलिं सर्व विश्वविभव; नहि, खरा
स्वर् भूवर: कारण आनंदि नंदन
देवांचा बाग, तयें पूर्वदिशेला
अेडनच्या नेर्ला; अेडन मर्यादा
औरणच्या पूर्वेला भव्य मनोरे

सेल्युक देशीय महान्. ग्रीक नृपांचें,
तिथ, किंवा प्राक्कालीं अेडन युवक
राहत त्या थेलासरिं; रम्यभूमिंत
अधिक रम्य दृश्यमयीं बाग निर्मिली
देवें, नि सुपीक भुअित रुजविले तयें
वृक्ष सकल, अति अुदार दृक्-रुचि-गंधीं,
तेथ सकल-मध्यवर्ती **जीवन**वृक्ष
प्रमुख अुंच फुलुनि जात अमरफलांनीं
वानस्पत कनकराचित; 'जीवना'पुढें
मरणरूप ज्ञानवृक्ष सन्निभ वाढे,
'सत्'-'चित्'चें ज्ञान क्रीत 'असत्' आणुनी !
दाक्षिणेस अेडनहुन रुंद नद वहे,
नच फिरवी मार्ग, परी तो कडयांतुनी
होत विवरिं गुप्त, क्षिप्त ओंश्वरेंच तो
डोंगर, अुद्यान-शिल्प अुंच जओं चढे
गतिमय नद-ओघावर जो पृथ्वीच्या
रंध्रनसा सदय तृषाक्रान्त शोषिता,
नव-निर्झररूपें तो मुरड मुरडुनी
सिंचित अुद्यान, अेकवटुनि तिथुनि घे
अुडि खोल दरींत; मिळे अधर प्रवाहीं,
जो अपुल्या अंधाऱ्या विवरांतुन ये,
अन् होअुनि भिन्न चार मुख्य प्रवाहीं
विविध बहे, भ्रमतो किति ख्यात राज्यकीं
नी राष्ट्रीं, वर्णन अनवश्य तयांचें,
परि केवळ सूचविण्या ( जरि 'कळा' शके
सुचवुं,) केंवि इंद्रनीलनिर्झुरांतुनी
वलयोर्मिल सरिता जै चपल धांवती
'प्राच्य मौक्तिकांतुनि नी कनकवाळुंत
भूलभुलैय्यांत लताकुंजतळवटीं
अमृतोपम वाहति, प्रतिवृक्षिं देखती,
फुलविति पुष्पांस योग्य नंदनिं, जीं ना
चतुरकला ताटव्यांत विस्मय-बंधीं,
परि सृष्टिच वररूपें वर्षि गिरि-दरा-

मैदानीं प्रचुर, जियें रवि अुदयींचा
जागवि भू अुवडि अुन्हुन प्रथम, अन् जिये
गहनझाडि पिंगटवी कुंज दुपारीं—
अैसा ही स्थलि, अैसें स्थान रम्य तें
वन्यश्री रुचिर विविधदर्शनकारी :
राजि, ज्यांत तरुसमृद्ध अश्रुसिंचनीं
ढाळिति सौगंध-डिंक आणि अंजनें;
इतर, ज्यांत गोडपणें डुलति फळ-घड
चमकदार सोनेरी-सालवेष्टित
(हेस्पिरीय सत्यकथा, सत्यजरि, तरी
येथेची केवळ), अन् मधुररुचियुतः
मधि शाद्वल वा सपाटपार, त्यावरी
कळप खुडित मृदु-अंकुर, अैशि जडविलीं
ताल–टेंबिवरती वा सुममय अंकीं
जलसिंचित दरिच्या, जी पसरि वैभवीं
सर्वरंगि सुम, कंटकहीन गुलाबः
बाजु दुजी; आच्छादित कंदरें अणी
थंड विवरयुक्त गुहा, आणि त्यांवरी
विणित ओढणी, करिते पुढति आपुली
नीलवर्ण किति द्राक्षें द्राक्षवेल अन्
हळुहळु वहरीं पसरे; मधिमधि झरती
अुतरंडीवरि निर्झर गुंजगुंजुनी
हो अनेकमुख अथवा ओघ मिळविती
पुष्करिणीमधि, जी धरि स्फटिकदर्पण
शोभिवन्त कंठांपर्यंत, ज्यांवरी
शेवंती भासतसे मुकुटसमान.
गाति विहग वृंदगान, अनिल साथ दे—
वासंतिक अनिल गंधवाहि क्षेत्रिंचा
वनराजींचाहि—तधी पर्णपंक्तिनां
जो नर्तनिं कंपवि, जैं विश्वदेवता
योग्य नृत्यताल(—काल?) आणि नृत्यविलासें
चिरवसंत जागवितो. नच स्पर्धालु

१ सिसिली द्वीपांत. पश्चिमच्या पुराणांच्या मतें वसुंधरा सिरिस हिची कन्या प्रॉसरपाअिन ही पातालेश्वर डिसूने रसातलीं हरण केली.

[1]अेन्नाची स्थलि जेथे वेंचितां सुमें,
        स्वतः कमनीयसुमन प्रॉझर्पाअिन्
वेंचियली त्या कभिन्न दस्युने (डीसने), जिला
        शोधाया सीरिसला श्रम किती पडे
धुंडधुंडतां त्रिखंड ! वा न मधुरसा
        डॅफ्नीचा कुंज ओरंटीस कांठिंचा,
आणिक तो स्फूर्त कॅस्टेलीय निर्झर
        स्पर्धतो न अेडनच्या नंदनवनिशीं
[2]किंवा न द्वीप निसीयन्, टिटॉन् नदी
        ज्यास मेखलेसमान, जेथ वृद्ध चाम्–
लोकीं जो ज्ञात अमॉन्, जोव्ह् लीबियन्
        लुसवी अमालथिया आणि सुत तिचा
रंगेल युवा बाकुस यांस, ह्विआच्या
        –सापत्ना मातेच्या–दृष्टिआडुनी.
अथवा नच, हवशीनृप रक्षती जिथें
        संतति तो अमरागिरि (जरि कुणी तया
मानितात नंदनवन साच, परी जो)
        अिथिओपिय पर्वतराजींत पसरतो
अुगमस्थलिं नाइलच्या, संवृत जो की
        अतिभास्वर पाषाणें, तुंग अतीव–
अेकदिनींचा प्रवास, परि सुदूर तें
        आसिरीय-अुद्यानापासुनिया या
ज्या स्थानावरुनि निरखितो पिशाच्च तो
        आनंदां सर्व निरानंद, अखिल तें
चेतनयुत जीवजात जें नवीनसें
        दृष्टिसि, अन् परिचित जें त्यास नोह–तें :
दोन अत्युदाररूप अुन्नत-अुंच,
        देवासम अुन्नत तद्देश्य आदरें
परिवृत, जीं नग्नवैभवांत वाटतीं

---

१ सीरीयामध्ये. ह्या नदीकांठीं सध्या अन्टीओक नगर आहे. ग्रीक महेंद्र अपोलो डॅफ्नीवर येथेच मुग्ध झाला. पण निसटण्याचा प्रयत्न करतांच ती लतेंत रूपांतरित झाली.

२ 'सोमदेव–'बाकस किंवा डायोनिसस् याची जन्मभूमि. अमालथिअेला द्युष्पति अमोन (वृद्ध चाम वा हॅम) अर्थात् जो–व्हलिब्रियन् यापासून हा पुत्र झाला असें मिल्टन मानतो.

स्वामिशीच सर्वांची, आणि योग्यही;
कारण तद्दिव्यदृष्टिमधि प्रकाशते
प्रतिमाच विधात्याची वैभवशाली,
सत्, विवेक मंगलता निष्ठुर-शुद्ध–
निष्ठुर परि तीं स्वतंत्रवात्सल्यांत
जनकाच्या नियत; म्हणून सदधिकार तो
पुरुषांमधिं नैसर्गिक; जरि दोघेंही
नच समान स्पष्ट लैङ्ग्यभिन्नतेमुळे;
चिन्तनार्थ तो अन् शौर्यार्थ निर्मिला :
मार्दवार्थ ती मधुरासक्तिसौष्ठवा;
तो देवास्तव केवळ : ती पतिदेवा;
तत्सुंदर-भव्य-भाल नयन अुदात्त
अुद्घोषति अेकतंत्र शासन, तैसे
द्राक्षतलेसम कुंतल निर्मितां वटा
पुरुषी थाटांत सुटे जैं रुळताती
भांग पुढें पडतां, परि लोम्बतात ना
ते विशाल अंसाच्यावरुनि खालतां :
ती ओढणिसारखे निरुंद-कटितटीं
अनलंकृत सोनेरी कुन्तल सोडी
गुंफगुंफले, परि निस्तंत्रवर्तुलीं
कुरळ तरंगति, जैशी द्राक्षवेल ती
मुरडि डिऱ्या कोमल अन् तेंवि ध्वनितसे
परवशता, जी मृदु बलजोरि-गृहीत
आणि तिने दत्त, तयें स्वागतीकृत–
दत्त ललितवशता,–शालीन अहंता–
अन् मधुराऽनिच्छत-शृंगार-विलंबें;
नच तेव्हा गूढांगें गोपित त्यांचीं,
ना तदा प्रमादि लाज, लाज अ-सच्ची
सृष्टि-कृतींची; विमाननीय मान जो,–
पापवृद्ध ! कैंवि तुंवा त्रस्त मानवी[१] (Humanity)
अुलटी, देखाव्यांनी, मात्र पोफळ
भपक्यांनीं वाहेरुन पावित्र्याच्या,

१ 'यादवां'पासून जशी 'यादवी' तशीच 'मानवां'पासून 'मानवी'; गुजरातींत रूढ.

अन् भ्रष्टीकृत मानव-जीवनांतुनी
जीवन तें सर्वाधिक सौख्यद त्याला—
साधेपण अन् अदोष निर्व्याजपणा....!
अैशीं तीं भ्रमति नग्न, परि न टाळिती
दृष्टि देव-गंधर्वीं, तैं, कारण कीं,
कल्पिलें न मनिं कांही वाअिट त्यांनी :
जात असे कर-गुंफुन रम्य-युग्म तें;
सर्वांहुन, तेंव्हापुन प्रणयाश्लेषीं
संमीलित जीं युग्में गाढ त्यांहुनी,
आदम तो रम्योत्तम पुरुषामध्ये
तन्निर्मित पुत्रांमधि; अधिकमनोज्ञा
अीव्ह तिच्या कन्यांहुन तदनंतरच्या.
बसलीं सच्छायकुंजिं मृदुकूजित जैं,
हरितशाद्वलांत, शीतनिर्झरकंठीं;
आणि, श्रम अधिक अकारण न करुनियां,
अुद्यानीं मधुरश्रम करितां, जे कीं
मलयानिल रुचवि थंड, अन् आरामीं
निर्मि अधिक आरामां, अन् वखवखती
क्षुधातृषा अधिक तुष्ट करिति, नंतर
पाडविती आहारा फलसंभार—
सुधामधुरफलें आज्ञांकितशाखांनीं
अर्पिलिं, जों, अेकपार्श्वि रेलुन बसतां,
मृदुसांकुर कांठावर पुष्पगंधित;
चाखिला रसाल गर्भ, साल चुंफिली,
रस झरतां शिगोशीग—तृष्णाशमतां;
नच नाजुक गुजगोष्टी, स्मित मोहक ना
आवश्यक, नच यौवन मत्तविलास
धुंदयुगुल्लास शोभतात जे, यदा
लग्न होत तीं मंगल लग्नमीलनीं
अेकाकी दोघेंही. त्यांच्याभंवतीं
बागडती वसुधेंतिल सर्व श्वापदें,
हिंस्र पुढे बनलीं, जीं पारध होतां
बनिं—अरण्यं अथवा कांतारिं कंदरीं;

खेळत झेपे मृगराट्, तत्पंजांत
करडुं रमे; व्याघ्रास्वलमांजर-चित्ता
खेळमेळ करिति पुढें; हत्ति अजस्र
देण्यासी मौज त्यांस शक्ति वापरी,
चल-शुंडा अुमि कमान; आणि समीपीं
छाम्रि सर्प मुळढंगी घट्ट गॉर्डियन्
गांठीनीं वेटोळे, अन् असावध
दे घातक कपटाचा पूर्ण पुरावा;
इतर तृणावरि कलती; तृप्त तृणाने
अंतरालिं बघति; वा रवंथ करीत
वळताति निचाऱ्यासी कीं, सूर्य अता
कललेला अस्तंगतिशील त्वरेने
सिंधु-द्वीपांत जात; नभ घाटींत
ललकारति संध्येचे बंदि, तारका.
जेव्हां सैतान प्रथम जैंवि तिष्ठला
तैंवि अजुन, विस्मितदृक् तो कसेंतरी
स्खलित वचन अंति खिन्न सावरी असे.

———

अनुक्रमणिका

# नियामक मंडळाची सभा

नियामक मंडळाची सभा ता. १५ एप्रिल १९३८ शुक्रवारी सकाळीं ८॥ वाजतां मुंबई येथें रॉबर्ट मनी हायस्कूलच्या दिवाणखान्यांत भरली होती. उपाध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार हे अध्यक्षस्थानीं होते. सभेस खालील २६ सभासद आले होतेः—

वा. वि. जोशी, गं. मा. तांबे, सी. रा. तावडे, य. रा. दाते, मो. ज्ञा. शहाणे, शांताबाई कशाळकर, वा. म. जोशी, श्री. म. वर्दे, ध. रा. गाडगीळ, दि. वि. काळे, मा. दा. अळतेकर, भा. वि. वरेरकर, कृ. पां. कुलकर्णी, न. का. घारपुरे, रा. श्री. जोग, कृ. ग. लिमये, श्री. ना. बनहट्टी, भ. रा. पाळंदे, द. अ. तुळजापूरकर, ना. के. बेहेरे, द. ग. काळे, द. वा. पोतदार, लालजी पेंडसे, श्री. दा. सातवळेकर, पां. वा. काणे, व र. शु. जोशी.

(१) मागील सभेचा वृत्तान्त वाचून कायम करण्यांत आला.

(२) कार्यकारी मंडळाने सादर केलेलें परिषदेचे १९३७ या वर्षाचें (एप्रिल–डिसेंबर) इतिवृत्त मान्य करावें अशी सूचना श्री. य. रा. दाते यांनी केली व त्यास सौ. शांताबाई कशाळकर यांनी अनुमोदन दिलें. ही सूचना सर्वानुमतें मान्य करण्यांत आली.

(३) १९३७ (एप्रिल–डिसेंबर) या वर्षाच्या जमाखर्चास मंजुरी देण्यांत यावी अशी सूचना श्री. य. रा. दाते यांनी केली व या सूचनेस प्रो. वा. म. जोशी यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती सर्वानुमतें मान्य करण्यांत आली.

(४) अंदाजिलेल्या खर्चापेक्षा अधिक खर्च झाला तो असाः—

प्रवास प्रचार ४०–१३–०, पुस्तकछपाई व बांधणी ३०–४–०, व्याकरणपरिषदेचा शिल्लक खर्च ८–०–०, शाखासभा ३९–०–०. या अधिक खर्चास मंजुरी देण्यास प्रि. सी. रा. तावडे यांनी सूचना केली व श्री. मो. ज्ञा. शहाणे यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती सर्वानुमतें मान्य झाली.

(५) १९३८ या वर्षाबद्दल अंदाजपत्रक सभेपुढे मांडल्यानंतर डॉ. न. का. घारपुरे यांनी घटनेच्या ३० व्या नियमाप्रमाणे या सभेस अंदाजपत्रकाचा विचार करतां येत नाही अशी हरकत घेतली. चर्चेनंतर अध्यक्षांनी निर्णय दिला की, नियम ३० चे तीन स्वतंत्र भाग पडतात, पैकी मधल्या भागांतील दोन कामें म्हणजे अहवाल व हिशेब आताच मंजूर झाले आहेत. यांच्याबरोबरचें तिसरें काम म्हणजे अंदाजपत्रक आताच घेणें प्राप्त आहे, करितां या वेळीं हरकत आणतां येत नाही. या निर्णयानंतर मांडलेलें अंदाजपत्रक मान्य करण्यांत यावें अशी सूचना प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी केली व या सूचनेस श्री. य. रा. दाते यांनी अनुमोदन दिलें. यानंतर राजरत्न वा. वि. जोशी यांनी परिषदेचा इतिहास छापण्यास लागणाऱ्या खर्चाविषयीं म्हणजे २०० रुपयांचा काट सुचविला, व डॉ. न. का. घारपुरे यांनी त्यास अनुमोदन दिले. चर्चेनंतर व अध्यक्षांनी खुलासा केल्यावर श्री. जोशी यांनी काट सुचविणारा ठराव परत घेतला. यानंतर अंदाजपत्रकांत साहित्यपत्रिकेबाबत दाखविलेला खर्च गाळण्यांत यावा अशी सूचना राजरत्न वा. वि. जोशी यांनी केली व या सूचनेस डॉ. घारपुरे यांनी अनुमोदन दिलें. प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी हा खर्च रुपये ५० असावा अशी उपसूचना केली व तीस

गं. मा. तांबे यांनी अनुमोदन दिलें. राजरत्न वा. वि. जोशी यांनी ही उपसूचना मान्य केली. यानंतर प्रि. तावडे यांनी हा खर्च रु. ११०० असावा अशी दुसरी उपसूचना केली, व तीस मो. शा. शहाणे यांनी अनुमोदन दिलें. राजरत्न वा. वि. जोशी यांनी प्रो. बनहट्टी यांनी स्वीकारलेली सूचना मतास घालतां ती बहुमताने अमान्य झाली. यानंतर प्रि. तावडे यांनी आपली उपसूचना परत घेतली. इतकें झाल्यावर मांडलेलें अंदाजपत्रक मतांस घालतां सर्वानुमतें मान्य करण्यांत आलें.

(६) कार्यकारी मंडळाने शिफारस केल्याप्रमाणे सभेने खालील ठरावास मान्यता दिली :—

"अध्यक्ष, व्यवस्थापकमंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, यांच्या क्रमांक १९२, तारीख ६–७–३७ च्या पत्रांत सुचविल्याप्रमाणे १९३०–३१ सालच्या थकलेल्या घरभाड्याच्या पोटीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय ही संस्था २० वर्षेपर्यंत कांहीहि आकार न घेतां परिषदेशीं संलग्न करून घेण्यांत येत आहे."

(७) मुंबई येथील बा. रा. प्रभु आदिकरून ५० सभ्यांचा पत्रिकेची वर्गणी वेगळी घेण्याविषयी व परिषदेची वर्गणी कमी करण्याविषयीचा अर्ज सभेपुढे मांडण्यांत आला. हा अर्ज साधारण सभेपुढे जावा अशी सूचना प्रो. बनहट्टी यांनी केली व तीस प्रि. ध.रा.गाडगीळ यांनी अनुमोदन दिलें. ही सूचना सर्वानुमतें मान्य झाली.

(८) उपसमित्यांचे वृत्तान्त त्यांवरील सूचनांसह नियामक मंडळाच्या शिफारशीशिवाय साधारण सभेपुढे मांडण्यांत यावेत अशी सूचना प्रो. बनहट्टी यांनी केली व तीस प्रि. गाडगीळ यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती सर्वानुमतें मान्य झाली.

(९) जळगांव-सम्मेलनाच्या ठरावांच्या अम्मलबजावणीचा वृत्तान्त सभेस सादर करण्यांत आला.

हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

———

## नियामक मंडळाची दुसरी सभा



घटना नियम ३० प्रमाणे संमेलनाच्या अधिवेशनानंतर नियामक मंडळाची सभा तारीख १७ एप्रिल १९३८ रविवारीं रात्रीं १० वाजतां मुंबई येथे संमेलनाच्या मंडपांत भरविण्यांत आली. सभेस खालील ११ सभासद आले होते:—

ना. के. बेहेरे, श्री. म. वर्दे, य. रा. दाते, मो. शा. शहाणे, कृ. ग. लिमये, रा. श्री. जोग, ग. गं. जांभेकर, कृ. पां. कुलकर्णी, शं. दा. पेंडसे, द. वा. पोतदार व र. लु. जोशी.

उपाध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार हे अध्यक्षस्थानीं होते. संमेलनांत झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीसंबंधी चर्चा होऊन लागणाऱ्या योजना निश्चित करण्यांत आल्या. कांही ठरावांच्या बाबतींत पोटमंडळें नेमण्यास कार्यकारी मंडळास सूचना करण्यांत आल्या.

घटना नियम ४९ अन्वयें खालील संपादकमंडळ निवडण्यांत आलें:—

प्रो. द. वा. पोतदार, प्रो. ना. के. बेहेरे, श्री. श्री. म. वर्दे, प्रो. मा. त्रि. पटवर्धन व श्री. लालजी पेंडसे.

इतकीं कामें झाल्यावर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

———

अनुक्रमणिका

# वार्षिक साधारण सभा

परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. १५ एप्रिल १९३८ शुक्रवारीं, दुपारीं १ वाजतां मुंबईस रॉबर्ट मनी हायस्कूलच्या दिवाणखान्यांत भरली होती. अध्यक्षस्थानीं परिषदेचे उपाध्यक्ष प्रो. पां. वा. काणे हे होते. सह्या तपासतां सभेस खालील ६४ सभासद उपस्थित असल्याचें दिसून येतें:—

सी. रा. तावडे, शांताबाई कशाळकर, ज. श्री. वाघ, प. चिं. गद्रे, न. का. घारपुरे, य. रा. दाते, वा. म. जोशी, दा. ना. आपटे, मा. त्रिं. पटवर्धन, रा. श्री. जोग, रा. अ. क्षीरसागर, पां. वा. जोशी, भा. रा. पटवर्धन, मो. श. शहाणे, शं. दा. पेंडसे, ना. के. बेहेरे, दा. ग. पाध्ये, गो. पां. पावशे, कृ. ग. लिमये, के. रा. पुरोहित, द. के. घाणेकर, पां. वा. काणे, भा. वि. वरेरकर, पु. के. कोतवाल, रा. मं. भातखंडे, गं. के. देशपांडे, कृ. पां. कुलकर्णी, द. वा. पोतदार, गं. ब. ग्रामोपाध्ये, ध. रा. गाडगीळ, शं. रा. शेंडे, वि. ष. देशपांडे, गं. गो. पुंडलिक, लालजी पेंडसे, ल. गं. काळे, श्री. ना. बनहट्टी, कृ. गो. मराठे, ना. म. पटवर्धन, वि. भि. कोलते, मा. गो. देशमूख, र. त्रि. कुळकर्णी, वि. ह. निजसुरे, वा. गो. मायदेव, पु. वि. बापट, भा. ल. पाटणकर, रा. चिं. श्रीखंडे, गं. मा. तांबे, वा. वि. जोशी, श्री. शा. हणमंते, शं. के. पेंडसे, नी. शं. नवरे, ना. म. भिडे, चिं. वि. जोशी, स. वि. देशपांडे, श्री. स. शेवडे, द. ग. काळे, ल. म. महाजन, मा. वि. किबे, ना. गो. चापेकर, दि. वि. काळे, प्र. वा. बापट, ना. के. भागवत, श्री. वा. नाईक, र. लु. जोशी.

१. गेल्या वार्षिक साधारण सभेचा व ता. ७ फेब्रुवारी १९३७ या दिवशीं भरलेल्या विशेष साधारण सभेचा असे दोन छापलेले वृत्तान्त वाचले गेले आहेत असें गृहीत धरून कायम करण्यांत आले.

२. अध्यक्षांनी खाली नांवें दिलेल्या दिवंगत साहित्यिकांबद्दल दुखवट्याचा ठराव मांडला त्यास सर्व सभासदांनी उभें राहून मान्यता दिली:—

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर; काव्यरत्नावलीकार श्री. नारायण नरसिंह फडणीस; श्रीमंत तुकोजीराव पवार, महाराज, देवास (थोरली पाती); डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे; श्री. श्रीपाद नरसिंह बेंडे; श्री. जयकृष्ण केशव उपाध्ये; श्री. हिराचंद नेमचंद दोशी; राजकवि चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे.

३. अध्यक्षांनी १९३६-३७ (एप्रिल १९३६ ते मार्च १९३७) व १९३७ (एप्रिल ते डिसेंबर) या वर्षांचें छापील इतिवृत्त तसेंच हिशेब सभेपुढे मांडल्यावर सभेने त्यांस मान्यता दिली.

४. प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी १९३८ या वर्षाकरिता पूर्वी नेमलेले हिशेबतपासनीस श्री. द. दा. देशपांडे व श्री. जि. कृ. परुळकर यांची नेमणूक करावी अशी सूचना केली. या सूचनेस श्री. य. रा. दाते यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती सर्वानुमतें मान्य झाली.

५. नियामक मंडळाच्या १ जून १९३७ या तारखेस भरलेल्या सभेने मंजुरीसाठी पाठविलेला देणग्यांसंबंधीचा ठराव प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी सभेपुढे मांडला. या ठरावांत

"किंवा कोणत्याहि विशिष्ट कार्यास" असे शब्द घालावे अशी उपसूचना रा. ब. दा. ग. पाध्ये यांनी केली व प्रो. वा. म. जोशी यांनी या उपसूचनेस अनुमोदन दिलें. ही उपसूचना सर्वानुमतें मान्य झाल्यानंतर ती ठरावाच्या रूपाने पुन्हा सभेपुढे मांडण्यांत येऊन सभेने तिला मान्यता दिली. ठराव खालील स्वरुपांत मान्य झालाः—

"परिषदेच्या इमारतनिधीस किंवा कोणत्याहि विशिष्ट कार्यास ५० किंवा अधिक रुपये देणगी देणाऱ्यांस देणगीच्या रकमेप्रमाणे परिषदेचे सभासद समजण्यांत यावें."

६. राजरत्न वा. वि. जोशी हे त्या वेळीं सभागृहांत नसल्यामुळे डॉ. न. का. घारपुरे यांनी श्री. जोशी यांचे ठराव सभेपुढे मांडले. चर्चेनंतर दोन्ही ठराव एकत्र न घेतां मात्र वर्गणी कमी करण्याचा विचार व्हावा असें ठरलें. डॉ. घारपुरे यांनी परिषदेची वर्गणी ३ रुपयांऐवजी २। रुपये घ्यावी असा ठराव सभेपुढे मांडला व त्यास श्री. र. वि. कुलकर्णी यांनी अनुमोदन दिलें. ठरावाविषयी प्रि. तावडे, श्री. रा. म. भातखंडे व राजरत्न वा. वि. जोशी (हे त्या वेळीं सभागृहांत आले होते) यांचीं प्रतिकूल व अनुकूल भाषणें झालीं. ठराव मतास घालतां १२ विरुद्ध २३ मतें पडून तो अमान्य झाला.

७. राजरत्न वा. वि. जोशी यांचा साहित्यपत्रिकेविषयींचा ठराव आधी न घेतां डॉ. घारपुरे यांच्या त्याच विषयावरील ठरावांतील "परिषदेने चालविलेली 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' बंद करण्यांत यावी" हा भाग प्रथम विचारांत घ्यावा असें सभेने बऱ्याच चर्चेनंतर ठरविलें. ह्या ठरावाविषयींची रीतसर सूचना डॉ. घारपुरे यांनी केल्यानंतर श्री. र. वि. कुळकर्णी यांनी त्यास अनुमोदन दिलें. चर्चेनंतर ठराव मतास घालतां दोनच अनुकूल मतें पडून तो अमान्य करण्यांत आला.

८. यानंतर राजरत्न वा. वि. जोशी यांच्या दुसऱ्या ठरावांतील खाली दिलेल्या (अ) या भागावर चर्चा व्हावी असा अध्यक्षांनी निर्णय दिला, व त्याप्रमाणे तो राजरत्न वा. वि. जोशी यांनी सभेपुढे मांडल्यानंतर त्यास श्री. र. वि. कुळकर्णी यांनी अनुमोदन दिलें:—

"(अ) महाराष्ट्र साहित्य पत्रिका ही दर महिन्यास प्रसिद्ध होत जावी, व तींत परिषदेच्या शाखासभेच्या व संलग्न संस्थांच्या कार्याचीच फक्त नोंद देत जावी."

यानंतर या ठरावांतील 'च' व 'फक्त' हे शब्द गाळून त्यांऐवजी 'हि' हा शब्द घालावा अशी उपसूचना श्री. भा. रा. पटवर्धन यांनी केली व या उपसूचनेस श्री. मा. वि. वरेरकर यांनी अनुमोदन दिलें. श्री. शं. रा. दांडे यांनी ही उपसूचना होत नाही अशी पद्धतिविषयक हरकत घेतली परंतु ती अध्यक्षांनी मान्य केली नाही. चर्चेनंतर उपसूचना मतास घालतां ३१ अनुकूल व ५ प्रतिकूल मतें पडून ती मान्य करण्यांत आली. ही उपसूचना खाली दिलेल्या शब्दांत ठराव म्हणून मतास घालतां २७ अनुकूल व ३ प्रतिकूल मतें पडून मान्य करण्यांत आलीः—

"महाराष्ट्र साहित्य पत्रिका ही दर महिन्यास प्रसिद्ध होत जावी, व तींत परिषदेच्या, शाखासभेच्या व संलग्न संस्थांच्या कार्याचीहि नोंद देत जावी.

९. डॉ. न. का. घारपुरे यांच्या ठरावांतील पहिला भाग अमान्य झाला असल्यामुळे इतर भाग घेण्याचें कारण उरत नाही असें अध्यक्षांनी जाहीर केलें.

# वार्षिक साधारण सभा



परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. १५ एप्रिल १९३८ शुक्रवारीं, दुपारीं १ वाजतां मुंबईस रॉबर्ट मनी हायस्कूलच्या दिवाणखान्यांत भरली होती. अध्यक्षस्थानीं परिषदेचे उपाध्यक्ष प्रो. पां. वा. काणे हे होते. सह्या तपासतां सभेस खालील ६४ सभासद उपस्थित असल्याचें दिसून येतेंः—

सी. रा. तावडे, शांताबाई कशाळकर, ज. श्री. वाघ, प. चिं. गद्रे, न. का. घारपुरे, य. रा. दाते, वा. म. जोशी, दा. ना. आपटे, मा. त्रिं. पटवर्धन, रा. श्री. जोग, रा. अ. क्षीरसागर, पां. वा. जोशी, भा. रा. पटवर्धन, मो. शा. शहाणे, शं. दा. पेंडसे, ना. के. बेहेरे, दा. ग. पाध्ये, गो. पां. पात्रशे, कृ. ग. लिमये, के. रा. पुरोहित, द. के. घाणेकर, पां. वा. काणे, भा. वि. वरेरकर, पु. के. कोतवाल, रा. मं. भातखंडे, गं. के. देशपांडे, कृ. पां. कुलकर्णी, द. वा. पोतदार, गं. ब. ग्रामोपाध्ये, ध. रा. गाडगीळ, शं. रा. शेंडे, वि. ध. देशपांडे, गं. गो. पुंडलिक, लालजी पेंडसे, ल. गं. काळे, श्री. ना. बनहट्टी, कृ. गो. मराठे, ना. म. पटवर्धन, वि. भि. कोलते, मा. गो. देशमूख, र. वि. कुळकर्णी, वि. ह. निजसुरे, वा. गो. मायदेव, पु. वि. बापट, भा. ल. पाटणकर, रा. चिं. श्रीखंडे, गं. मा. तांबे, वा. वि. जोशी, श्री. शा. हणमंते, शं. के. पेंडसे, नी. शं. नवरे, ना. म. भिडे, चिं. वि. जोशी, स. वि. देशपांडे, श्री. स. शेवडे, द. ग. काळे, ल. म. महाजन, मा. वि. किबे, ना. गो. चापेकर, दि. वि. काळे, प्र. वा. बापट, ना. के. भागवत, श्री. वा. नाईक, र. लु. जोशी.

१. गेल्या वार्षिक साधारण सभेचा व ता. ७ फेब्रुवारी १९३७ या दिवशीं भरलेल्या विशेष साधारण सभेचा असे दोन छापलेले वृत्तान्त वाचले गेले आहेत असें गृहीत धरून कायम करण्यांत आले.

२. अध्यक्षांनी खाली नांवें दिलेल्या दिवंगत साहित्यिकांबद्दल दुखवट्याचा ठराव मांडला त्यास सर्व सभासदांनी उभें राहून मान्यता दिलीः—

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर; काव्यरत्नावलीकार श्री. नारायण नरसिंह फडणीस; श्रीमंत तुकोजीराव पवार, महाराज, देवास (थोरली पाती); डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे; श्री. श्रीपाद नरसिंह वेंडे; श्री. जयकृष्ण केशव उपाध्ये; श्री. हिराचंद नेमचंद दोशी; राजकवि चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे.

३. अध्यक्षांनी १९३६-३७ (एप्रिल १९३६ ते मार्च १९३७) व १९३७ (एप्रिल ते डिसेंबर) या वर्षांचें छापील इतिवृत्त तसेंच हिशेब सभेपुढे मांडल्यावर सभेने त्यांस मान्यता दिली.

४. प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी १९३८ या वर्षाकरिता पूर्वी नेमलेले हिशेबतपासनीस श्री. द. दा. देशपांडे व श्री. जि. कृ. परुळकर यांची नेमणूक करावी अशी सूचना केली. या सूचनेस श्री. य. रा. दाते यांनी अनुमोदन दिल्यानंतर ती सर्वानुमतें मान्य झाली.

५. नियामक मंडळाच्या १ जून १९३७ या तारखेस भरलेल्या सभेने मंजुरीसाठी पाठविलेला देणग्यांसंबंधीचा ठराव प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी सभेपुढे मांडला. या ठरावांत

"किंवा कोणत्याहि विशिष्ट कार्यास" असे शब्द घालावे अशी उपसूचना रा. ब. दा. ग. पाध्ये यांनी केली व प्रो. वा. म. जोशी यांनी या उपसूचनेस अनुमोदन दिलें. ही उपसूचना सर्वानुमतें मान्य झाल्यानंतर ती ठरावाच्या रूपाने पुन्हा सभेपुढे मांडण्यांत येऊन सभेने तिला मान्यता दिली. ठराव खालील स्वरूपांत मान्य झालाः—

"परिषदेच्या इमारतनिधीस किंवा कोणत्याहि विशिष्ट कार्यास ५० किंवा अधिक रुपये देणगी देणाऱ्यांस देणगीच्या रकमेप्रमाणे परिषदेचे सभासद समजण्यांत यावें."

६. राजरत्न वा. वि. जोशी हे त्या वेळीं सभागृहांत नसल्यामुळे डॉ. न. का. घारपुरे यांनी श्री. जोशी यांचे ठराव सभेपुढे मांडले. चर्चेनंतर दोन्ही ठराव एकत्र न घेतां मात्र वर्गणी कमी करण्याचा विचार व्हावा असें ठरलें. डॉ. घारपुरे यांनी परिषदेची वर्गणी ३ रुपयांऐवजी २॥ रुपये घ्यावी असा ठराव सभेपुढे मांडला व त्यास श्री. र. वि. कुलकर्णी यांनी अनुमोदन दिलें. ठरावाविषयी प्रि. तावडे, श्री. रा. म. भातखंडे व राजरत्न वा. वि. जोशी (हे त्या वेळीं सभागृहांत आले होते) यांचीं प्रतिकूल व अनुकूल भाषणें झालीं. ठराव मतास घालतां १२ विरुद्ध २३ मतें पडून तो अमान्य झाला.

७. राजरत्न वा. वि. जोशी यांचा साहित्यपत्रिकेविषयीचा ठराव आधी न घेतां डॉ. घारपुरे यांच्या त्याच विषयावरील ठरावांतील "परिषदेने चालविलेली 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' बंद करण्यांत यावी" हा भाग प्रथम विचारांत घ्यावा असें सभेने बऱ्याच चर्चेनंतर ठरविलें. ह्या ठरावाविषयीची रीतसर सूचना डॉ. घारपुरे यांनी केल्यानंतर श्री. र. वि. कुळकर्णी यांनी त्यास अनुमोदन दिलें. चर्चेनंतर ठराव मतास घालतां दोनच अनुकूल मतें पडून तो अमान्य करण्यांत आला.

८. यानंतर राजरत्न वा. वि. जोशी यांच्या दुसऱ्या ठरावांतील खाली दिलेल्या (अ) या भागावर चर्चा व्हावी असा अध्यक्षांनी निर्णय दिला, व त्याप्रमाणे तो राजरत्न वा. वि. जोशी यांनी सभेपुढे मांडल्यानंतर त्यास श्री. र. वि. कुळकर्णी यांनी अनुमोदन दिलें:—

"(अ) महाराष्ट्र साहित्य पत्रिका ही दर महिन्यास प्रसिद्ध होत जावी, व तींत परिषदेच्या शाखासभेच्या व संलग्न संस्थांच्या कार्याचीच फक्त नोंद देत जावी."

यानंतर या ठरावांतील 'च' व 'फक्त' हे शब्द गाळून त्यांऐवजी 'हि' हा शब्द घालावा अशी उपसूचना श्री. भा. रा. पटवर्धन यांनी केली व या उपसूचनेस श्री. भा. वि. वरेरकर यांनी अनुमोदन दिलें. श्री. शं. रा. दांडे यांनी ही उपसूचना होत नाही अशी पद्धतिविषयक हरकत घेतली परंतु ती अध्यक्षांनी मान्य केली नाही. चर्चेनंतर उपसूचना मतास घालतां ३१ अनुकूल व ५ प्रतिकूल मतें पडून ती मान्य करण्यांत आली. ही उपसूचना खाली दिलेल्या शब्दांत ठराव म्हणून मतास घालतां २७ अनुकूल व ३ प्रतिकूल मतें पडून मान्य करण्यांत आलीः—

"महाराष्ट्र साहित्य पत्रिका ही दर महिन्यास प्रसिद्ध होत जावी, व तींत परिषदेच्या, शाखासभेच्या व संलग्न संस्थांच्या कार्याचीहि नोंद देत जावी.

९. डॉ. न. का. घारपुरे यांच्या ठरावांतील पहिला भाग अमान्य झाला असल्यामुळे इतर भाग घेण्याचें कारण उरत नाही असें अध्यक्षांनी जाहीर केलें.

१०. डॉ. अ. ना. भालेराव यांनी पाठविलेला खालील ठराव ते सभागृहांत नसल्या-मुळे तो श्री. श्री. म. वर्दे यांनी सभेपुढे मांडला व त्यास सौ. शांताबाई कशाळकर यांनी अनुमोदन दिलें:—

"नियम ५२ मध्ये फेरफार:—'मराठी भाषा बोलणारांचें साहित्यसंमेलन शक्य तर दरसाल बोलवावें' याऐवजी 'मराठी भाषा बोलणारांचें साहित्यसंमेलन दोन वर्षांनी भरवावें.'"

ठराव मतास घालतां दोनच अनुकूल मतें पडून तो अमान्य करण्यांत आला.

११. यानंतर वेळ झाल्यामुळे सभा तहकूब केल्याचें व सायंकाळीं संमेलनाच्या बैटकी-नंतर पुन्हा भरविण्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें.

१२. ही तहकूब झालेली सभा सायंकाळीं ६॥ वाजतां भरविण्यांत आली. सभेस खालील सभासद ५१ आले होते:—

य. रा. दाते, वा. म. जोशी, पु. के. कोतवाल, भा. रा. पटवर्धन, भा. वि. वरेरकर, ध. रा. गाडगीळ, श. वा. रानडे, न. का. घारपुरे, गं. ल. खिरवडकर, ज. श्री. वाघ, दा. ना. आपटे, म. ब. ताम्हनकर, श्री. ना. बनहट्टी, दा. ग. पाध्ये, म. पां. सबनीस, ग. वा. ताम्हणे, ज. र. घारपुरे, ना. के. बेहेरे, ना. म. भिडे, श्री. नी. चाफेकर, सी. रा. तावडे, चिं. पां. बर्वे, गं. गो. पुंडलिक, वि. ह. निजसुरे, चिं. वि. जोशी, नी. शं. नवरे, द. ग. काळे, द. वा. पोतदार, ल. भ. महाजन, गं. मा. तांबे, शं. का. गोखले, ना. के. भागवत, शं. गो. घैसास, प्र. बा. बापट, कृ. गो. मराठे, मा. वि. किबे, सौ. कमलाबाई किबे, वा. गो. ऊर्ध्वरेषे, ना. गो. चाफेकर, पां. वा. जोशी, भा. सि. सुकथनकर, द. आ. तुळजापूरकर, चिं. नी. जोशी, ग. गं. जांभेकर, शं. के. पेंडसे, श्री. स. शेवडे, रा. म. भातखंडे, र. लु. जोशी. वि. ल. नामजोशी, पां वि. महाजनी, द. दा. काळे.

१३. राजरत्न वा. वि. जोशी यांच्या दुसऱ्या ठरावांतील खालीं दिलेला '(आ)' हा भाग '(अ)' या भागामध्ये फरक झाल्यामुळे पडला आहे असें समजावें असा अध्यक्षांनी निर्णय दिला:—

"(आ) तिचें संपादन कार्याध्यक्ष व चिटणीस यांजकडे सोपविण्यांत यावें."

१४. डॉ. न. का. घारपुरे यांनी पुढील ठराव सभेपुढे मांडला:—

"घटना नियम १५ (अ) खालीलप्रमाणे असावा:—

'सभासदाच्या अर्जावर त्याचा विभाग लिहून घ्यावा. नोंदलेला विभागच त्याचा विभाग समजण्यांत यावा. सभासदास ज्या विभागांत आपलें नांव नोंदवावयाचें असेल त्या विभागांत निवडणुकीपूर्वी त्याचें निदान १ वर्ष तरी वास्तव्य असलें पाहिजे.'"

या ठरावास श्री. म. पां. सबनीस यांनी उपसूचना केली ती अशी:— "'निवडणु-कीच्या तारखेपूर्वी सलग सहा महिने तरी त्याचें वास्तव्य त्या विभागांत असलें पाहिजे' असा फरक ठरावांत करावा." ही उपसूचना डॉ. न. का. घारपुरे यांनी मान्य केली व या उप-सूचनेसह ठराव मतास घालतां तो सभेस अमान्य झाला.

१५ श्री. शं. रा. शेंडे यांचा खालील ठराव विचारार्थ घेण्यांत आला:—

"नियम १५ (अ) च्या पहिल्या वाक्यांतील 'त्याचा' शब्दापुढे 'त्या वेळीं रहिवास असलेला' हे शब्द घालवित."

या टरावास श्री. म. पां. सबनीस यांनी 'त्या वेळीं' या शब्दांऐवजी 'सहा महिने पूर्वी' हे शब्द घालावेत अशी उपसूचना आणली. ही उपसूचना मतास घालतां अमान्य झाली व श्री. शेंडे यांचा ठराव मान्य करण्यांत आला.

१६ यानंतर प्रि. ध. रा. गाडगीळ यांनी आता सभा बरखास्त करावी अशी सूचना केली व या सूचनेस श्री. ग. गं. जांभेकर यांनी अनुमोदन दिलें. ही सूचना बहुमताने मान्य झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

---

# सभासदांस सूचना

कोंकणी अहिराणी समितीचा वृत्तान्त चालू अंकांत प्रसिद्ध झाला आहे. सभासदांनी हा वृत्तान्त वाचून आपल्या सूचना कार्यालयांत पाठवाव्या अशी विनंती आहे. त्याचप्रमाणे व्याकरणसमिति व लिपिसमिति यांच्या पत्रिकेच्या ऑक्टोबर १९३६ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या वृत्तान्ताविषयीहि सूचना पाठवाव्या. या बाबतींत अनेकदा स्मरण दिलें असतांहि कार्यालयांत अवघी एक सूचना आली आहे.

वर्षारंभ होऊन सहा महिने झाले आहेत. बाकीदार सभासदांकडे बाकी वर्गणीचीं कार्डें गेल्या अंकासोबत रवाना झालीं आहेत. ज्यांनी आपली वर्गणी अद्याप पाठविली नाही त्यांनी ती आता त्वरेने पाठविण्याची कृपा करावी. मुंबईस डॉ. अ. ना. भालेराव व नागपूरास परिषदेचे चिटणीस प्रो. ना. के. बेहेरे यांजकडे वर्गणीचा भरणा केल्यास कार्यालयांतून रीतसर पावती सभासदांकडे जाईल.

---

अनुक्रमणिका

# मुंबई येथे भरलेल्या २२ व्या म. सा. संमेलनांत मान्य झालेले ठराव

## ठराव १

खाली नांवें दिलेले जे साहित्यिक गेल्या वर्षांत कालवश झाले त्यांच्या साहित्यसेवेचा हें संमेलन कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत आहे. तसेंच त्यांच्या मरणामुळे त्यांच्या कुटुंबीयांना झालेल्या दुःखांत संमेलन वांटेकरी आहे असें त्यांच्या कुटुंबांतील माणसांस आश्वासन देत आहे:--

(१) कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, (२) काव्यरत्नावलीकार कै. नारायण नरसिंह फडणीस, (३) कै. श्री. तुकोजीराव पवार, महाराज, देवास (सीनिअर), (४) कै. डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे, (५) कै. श्रीपाद नरसिंह बेंडे, (६) कै. जयकृष्ण केशव उपाध्ये, (७) प. वा. हिराचंद नेमचंद दोशी, (८) राजकवि कै. चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे.

## ठराव २

हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख देशी भाषांची वाढ होऊन त्यांना राष्ट्रीय संस्कृतींत समान दर्जा मिळावा हें शिक्षणपद्धतीचें ध्येय असलें पाहिजे. या दृष्टीने प्राथमिक शिक्षणाप्रमाणेच महाविद्यालयांतील शिक्षणहि त्या त्या प्रांतांतील देशी भाषेंतून दिलें जावें या तत्त्वाचा पुरस्कार संमेलन प्रथमपासून करीत आलें असून या तत्त्वाची आपल्या शिक्षणक्रमांत अंमलबजावणी केल्याबद्दल हें संमेलन श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिलाविद्यापीठाचें अभिनंदन करीत आहे. तसेंच या विद्यापीठास सरकारमान्य विद्यापीठाचा दर्जा मिळवून देण्याची जरुर ती व्यवस्था करावी, अशी मुंबई मंत्रिमंडळापाशीं या संमेलनाची आग्रहाची मागणी आहे.

## ठराव ३

भाषावार प्रांतरचना असणें व देशी भाषांतून शिक्षण देणें हें तत्त्व आता सर्वमान्य झाल्याने महाराष्ट्र, गुजराथ व इतर प्रांतांकडून आपापल्या विद्यापीठांची मागणी होत आहे. मराठी साहित्य संमेलनाने या तत्त्वाचा यापूर्वींच पुरस्कार केला असून महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधीं पूर्वी जो ठराव केला आहे त्याचा हें अधिवेशन पुन्हा उच्चार करीत आहे. या विद्यापीठाच्या मागणीला मुंबई सरकारच्या अर्थमंत्र्यांनी आपल्या कायदेमंडळांतील भाषणांत उघड पुष्टि दिल्याने विद्यापीठाच्या स्थापनेला अधिक अनुकूलता मिळाली आहे. म्हणून या संमेलनाची मंत्रिमंडळाला अशी आग्रहाची विनंती आहे, की महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करण्याची योजना मंत्रिमंडळाने तातडतोब अम्मलांत आणावी; तसेंच सर्व शिक्षणप्रेमी जनतेने या कामाला उदार हाताने द्रव्यसाहाय्य करावें.

## ठराव ४

मुंबई व मध्यप्रांत मंत्रिमंडळाने आक्षिप्त म्हणून गणल्या गेलेल्या कांही पुस्तकांवरील बंदी उठविली आहे याबद्दल हें संमेलन या मंत्रिमंडळांचें अभिनंदन करीत आहे, व बाकीच्या

अनुक्रमणिका

पुस्तकांवरील बंदीहि विनाविलंब उठविण्यांत यावी अशी आग्रहाची मागणी करीत आहे. तथापि बंदी उठविण्याचें धोरण दिरंगाईचें झालें असल्याने ही बंदी न उठविल्यामुळे वाङ्मयाची व जीवनाची हानि होत आहे, आणि राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीने ही बंदी अनिष्ट आहे असें या संमेलनचें निश्चित मत असल्यामुळे मंत्रिमंडळाने हा प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचा व तातडीचा समजून तो त्वरित सोडवावा अशी सविनय पण साग्रह विनंती आहे. तसेच (अ) कोणत्याहि प्रकारच्या उघड व कायदेशीर चौकशीवांचून आजपर्यंत जीं पुस्तकें जप्त करण्यांत आलीं आहेत त्या सर्वांवरची बंदी अधिक दिरंगाई न करितां विनशर्त काढून टाकावी. (आ) छापखाने व वाङ्मयप्रकाशन यांची गळचेपी करणारे जे निर्बंध कायद्याने घातलेले आहेत ते मुंबई—मध्यप्रांत सरकारांनी तावडतोब काढून टाकावे. यांपैकी जे कायदे रद्द करणें या सरकारांच्या अधिकाराबाहेरचें असेल त्या कायद्यांची त्यांनी आपापल्या प्रांतांत अंमलबजावणी करूं नये. (इ) प्रांतिक सरकारांकडे वरील मागणी करीत असतांना, गेल्या जुलै १९३७ मध्ये श्री. एन्. एम्. जोशी यांच्या नेतृत्वाखाली शिष्टमंडळाने मुंबई मंत्रिमंडळापुढे ज्या मागण्या मांडल्या त्यांस हें संमेलन पाठिंबा देत असून या प्रश्नाकडे जनतेचें पुन्हा एकदा लक्ष वेधीत आहे, व बंदी आणि निर्बंध रद्द करून घेण्याकरिता जोराची चळवळ चालू ठेवावी अशी त्यास सूचना देत आहे. त्याचप्रमाणे मराठी भाषा ज्यांत चालू आहे अशा संस्थानांत वाङ्मयावर जे निर्बंध घातले आहेत ते त्या त्या संस्थानांनी काढून टाकून जप्त वाङ्मय मुक्त करावें अशी या संमेलनाची मागणी आहे.

## ठराव ५

परभाषांत प्रसिद्ध होणाऱ्या उत्कृष्ट ललित व शास्त्रीय ग्रंथांची भर मराठी वाङ्मयांत घालणें अवश्य व हिताचें असल्याने तशा वाङ्मयकृतींची निवड करून त्यांचीं भाषांतरें प्रसिद्ध करविण्याचे प्रयत्न महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावे अशी या संमेलनाची परिषदेला आग्रहाची शिफारस आहे.

## ठराव ६

हिंदुस्थानची सध्या जी प्रांतवार विभागणी करण्यांत आली आहे तिच्यांत दोन प्रांतांच्या सीमाभागावरील कांही प्रदेश कोणत्या तरी एका प्रांताला जोडले जाऊन त्या प्रदेशांतील अन्यभाषा बोलणाऱ्या लोकांना त्या प्रांताच्या भाषेंतून शिक्षण घ्यावें लागतें. जेथे जेथे असा प्रश्न उत्पन्न होत असेल तेथे तेथे त्या प्रांतांतील सरकारांनी मराठी शिक्षणाची सोय तावडतोब करणें अवश्य आहे. मुंबई म्युनिसिपालिटीने येथील मद्रासी लोकांकरिता व पुणें म्युनिसिपालिटीने गुजराथी लोकांकरिता त्यांच्या भाषांतून शिक्षण देण्याची जी सोय केली आहे तिचें अनुकरण मुख्यतः मध्यप्रांत व मुंबई सरकारांनी करून त्या विभागांत मराठी शाळा काढण्याची तावडतोब व्यवस्था करावी, अशी या संमेलनाची या दोन्ही सरकारांकडे जोराची मागणी आहे.

## ठराव ७

(अ) हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं नभोवाणीकेंद्रांची स्थापना करून तद्द्वारा लोकशिक्षणाचे व लोकरंजनाचे कार्यक्रम भारतीय भाषांच्या द्वारा प्रसृत करण्याचा सरकारने केलेला उपक्रम या संमेलनास स्वागतार्ह व उत्तेजनार्ह वाटतो. परंतु त्याचबरोबर हें संमेलन सरकारास असें सुचवितें की नभोवाणीकेंद्रांतून प्रसृत केल्या जाणाऱ्या कार्यक्रमाची आंखणी

व पद्धति यांमध्ये भाषाशुद्धि व भाषासौष्ठव यांच्याकडे जेवढें लक्ष पुरविण्यास हवें तेवढें पुरविलें जात नाही; म्हणून नभोवाणीकेंद्रांचे कार्यक्रम ठरवितांना तज्ज्ञ सल्लागारांचा अभिप्राय घेण्याची योजना करण्यांत यावी. यासाठी, प्रत्येक नभोवाणीकेंद्राला एकेक सल्लागारमंडळ असावें व त्यांत त्या त्या विभागांतील साहित्यपरिषदेसारख्या संस्थांच्या प्रतिनिधींचा समावेश अवश्य करण्यांत यावा अशी या संमेलनाची मागणी आहे. (आ) मुंबई नभोवाणी या केंद्राबद्दल या संमेलनाची अशी तक्रार आहे की, मुंबईसारख्या मराठी भाषा बोलणाऱ्यांच्या प्रधान केंद्रांत मराठी भाषेंतील कार्यक्रमांना योग्य व भरपूर स्थान दिलें जात नाही. तें यापुढे अधिक मिळणें अवश्य आहे. तसेंच महाराष्ट्रांत पुणें, नागपूर वगैरे ठिकाणीं मराठी भाषेंतील कार्यक्रमांना प्राधान्य देणारीं नभोवाणीकेंद्रें त्वरित स्थापन करण्याची वेळ आलेली आहे असें या संमेलनाचें निश्चित मत आहे. (इ) मुंबई केंद्रातर्फे दिल्या जाणाऱ्या बातम्या, जाहिराती व इतर माहिती मराठींतून द्यावी, तसेंच पुस्तकपरीक्षण, नाटकें, गोष्टी, पोवाडे, लावण्या, लोकगीतें यांना प्राधान्य द्यावें. गायकांत मराठी गाणीं म्हणणाऱ्यांचा भरणा अधिक असावा.

## ठराव ८

मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजांत मराठी भाषेच्या अध्यापनाची गेलीं कित्येक वर्षे सोय नसल्यामुळे मराठी विद्यार्थ्यांची व भाषेची फार हेळसांड होत आहे. अशा स्थितींत पुढील वर्षापासून प्रस्तुत कॉलेजांत एक मराठी व्याख्यात्याची तात्पुरती जागा सरकारने निर्माण केली ही गोष्ट केली ही गोष्ट कांहीशी समाधानकारक असली तरी या संस्थेंत मराठी भाषेचा स्वतंत्र व कायम प्राध्यापक नेमून व मराठीभाषाध्यापनाची उत्तम सोय करून हा अन्याय दूर करावा अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

## ठराव ९

"अन्‌रजिस्टर्ड" व्ही. पी. ने पार्सल पाठविण्याची बंदी पोस्टखात्याने केल्यापासून पुस्तकें व नियतकालिकें यांचा खप बराच कमी झाला आहे. म्हणून ही बंदी काढून टाकण्यासंबंधी, तसेंच बुकपोस्टाचे दर कमी करण्यासंबंधी योग्य ती खटपट म. सा. परिषदेने करावी.

## ठराव १०

सरकारी नोकरींत असतांना लिहिलेली एक कविता आक्षिप्त ठरवून तेवढ्या सबबीवर श्री. ना. के. बेहरे यांना मध्यप्रांत सरकारने नोकरीवरून दूर केलें, असाच प्रकार इतरहि कांही प्रांतांत कांही नोकरांच्या बाबतींत झाला आहे. त्या सर्वांच्या प्रकरणांची फेरचौकशी करून त्यांना समाधानकारक न्याय द्यावा अशी या संमेलनाची त्या त्या सरकारकडे मागणी आहे.

## ठराव ११

आजच्या विषम सामाजिक व आर्थिक परिस्थितीमुळे बहुसंख्य लेखकवर्गावर अनेक नियंत्रणें पडत आहेत. यामुळे राष्ट्राचें फार नुकसान होत आहे. लेखकवर्गाला स्वातंत्र्य मिळविण्याचे प्रयत्न त्या वर्गाने आपली संघटना करून करावयाचे असल्याने, त्यांनी आपली संघटना करावी अशी या संमेलनाची त्यांस शिफारस आहे.

## ठराव १२

नाटक करण्याला परवानगी देण्यासंबंधीची सध्याची पद्धति बेबंद स्वरूपाची आहे. नाटक करण्यासाठी डि. मॅजिस्ट्रेटकडून निरनिराळे परवाने मिळवावे लागतात. हे अधिकारी

आपल्या लहरीप्रमाणें परवाने देतात किंवा नाकारतात. या प्रकारांत एका ठिकाणीं परवानगी मिळालेल्या नाटकांस दुसऱ्या ठिकाणीं बरेच वेळां मज्जाव होतो किंवा फेरबदल सुचविले जातात. यामुळे नाटक मंडळीचें पुष्कळच नुकसान होतें; तशीच वाङ्मयाची व कलेचीहि हानि होते. ही अनवस्था टाळण्यासाठी नाटकांच्या प्रयोगांकरिता परवाना देण्याचा अधिकार प्रत्येक प्रांतांत एकाच अधिकाऱ्याला देण्यांत यावा व असा परवाना मिळाल्यावर त्या सर्व प्रांतांत कोठेहि नाट्यप्रयोग करतां यावा. यासाठी जरूर वाटल्यास सध्याच्या कायद्यांत दुरुस्ती करून किंवा इतर प्रकाराने योग्य ती व्यवस्था करून घेण्याची खटपट म. सा. परिषदेने करावी.

## ठराव १३

आग्रा विद्यापीठाने आपल्या अभ्यासक्रमांत मराठीचा समावेश पूर्वीपासून केला आहे, ही गोष्ट अभिनंदनास पात्र आहे. या विद्यापीठानें धोरण पूर्ण होण्यासाठी एम्. ए. लाहि मराठी विषय लावावा. तसेंच इंदूर, ग्वाल्हेर इत्यादि ठिकाणच्या कॉलेजांत एम्. ए. च्या मराठी शिक्षणाची सोय व्हावी अशी या संमेलनाची आग्रा विद्यापीठास आणि त्या त्या संस्थानिकास आग्रहाची विनंती आहे.

## ठराव १४

चांगल्या मराठी पुस्तकांच्या लेखकांना उत्तेजन मिळावें या हेतूने इंदूरसरकार पूर्वी सालिना देणगी देत असे. ती देणगी मध्यंतरीं बंद पडली. ती पुन्हा चालू करून चांगल्या वाङ्मयाला उत्तेजन द्यावें अशी या संमेलनाची इंदूर सरकारला आग्रहाची विनंती आहे.

## ठराव १५

अलीकडे जीवनव्यवहार व्यापक होत असल्यामुळे नवीन नवीन शब्दांची नड वाढत आहे; म्हणून चटकन् समजूं शकतील व व्यवहारांत सहज उपयोगांत आणतां येतील असे सोपे, साधे व अर्थवादी शब्द शक्य तों मराठी वळणाचे बनवावेत आणि अनवश्यक असे संस्कृत किंवा इतर भाषांतील दुर्बोध शब्द बळें वळें घालूं नयेत असें या संमेलनाचें मत आहे.

## ठराव १६

कर्नाटक प्रांत स्वतंत्र व्हावा म्हणून आजपर्यंत केलेल्या प्रयत्नांमुळे मुंबई व मद्रास प्रांतांच्या असेंब्लींत अनुकूल निर्णय येण्यांत आला याबद्दल हें संमेलन सर्व कर्नाटकाचें अभिनंदन करीत आहे. या तत्त्वावरच वऱ्हाड, नागपूर व जेथे जेथे महाराष्ट्रीय बहुसंख्य आहेत ते प्रांत एकत्र जोडून मराठी बोलणारांचाहि तसाच निराळा विभाग करावा अशी या संमेलनाची महाराष्ट्रास आग्रहाची सूचना आहे. बेळगांव, कारवार वगैरे जिल्ह्यांत मराठी भाषा बोलणारे बरेच तालुके आणि गांवें असल्याने कोणत्या भाषेच्या प्रांतांत आपल्या तालुक्याचा व गांवांचा समावेश व्हावा ह्याचा निकाल स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर गांव हे परिमाण म्हणून वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांचीं मतें घेऊन ( Plebiscite ) ने लावण्यांत यावा अशी विनंती हें संमेलन सरकारास करीत आहे नवीन होणाऱ्या कर्नाटक प्रांतांत अल्पसंख्य असलेल्या महाराष्ट्रीयांच्या मुलांना मराठी भाषेतून प्राथमिक शिक्षण मिळेल अशी जबाबदारी त्या प्रांताच्या सरकारवर लादण्यांत यावी अशी या संमेलनाची मागणी आहे.

## ठराव १७

पुढील अधिवेशनासाठी महाराष्ट्र शारदा मंडळाचें रीतसर आमंत्रण आलेलें आहे; आणि अहमदनगर येथील नगर वाङ्मयोपासक मंडळाचें आमंत्रण आलेलें आहे परंतु तें घटना नियम ५४ (अ) प्रमाणे लागणाऱ्या वेळेपूर्वी आलेलें नाही. तथापि नगर येथे अखिल महाराष्ट्र साहित्य संमेलन यापूर्वी कधीहि भरलेलें नाही हें लक्ष्यांत घेऊन मुदतीची– ५४ (अ) नियमाची अडचण यंदा अपवाद म्हणून नजरेआड करण्याविषयी महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे तशी विनंती करावी अशी शिफारस करून हें संमेलन पुढील अधिवेशन अहमदनगर येथे भरविण्याचें आमंत्रण स्वीकारतें.

## ठराव १८

समाजाच्या विचारशक्तीला चालना देऊन प्रगतिपर विचारसरणीची जोपासना करणें हें लेखकांचें व कलावंतांचें महत्त्वाचें काम असल्यामुळे ते राष्ट्रहित व संस्कृति यांचे खरे संरक्षक आहेत. साम्राज्यवाद्यांकडून युद्धाची तयारी जोरांत होत असून युद्धाला अनुकूल असें लोकमत व्हावें म्हणून प्रचार चालू आहे. पण साम्राज्यसंरक्षणासाठी व वर्धनासाठी होणारीं युद्धें मानवी संस्कृति, शांतता व स्वातंत्र्य यांच्या मुळावर घाव घालणारीं आहेत. म्हणून युद्धविरोधी विचारांची जागृति करणें आणि त्या युद्धांचा योग्य प्रतिकार करण्यास समर्थ होण्यासाठीं आर्थिक आणि सैनिक सिद्धता करण्याच्या दृष्टीने अवश्य तो प्रचार करणें हें आजच्या लेखकांचें व कलावंतांचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. या कर्तव्याकडे हें संमेलन सर्व लेखक, कवि, चित्रकार इत्यादि कलावंतांचें लक्ष वेधीत आहे.

## ठराव १९

(अ) श्रीमंत सरकार सयाजीराव गायकवाड यांनी कोल्हापूर संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत सुचविल्याप्रमाणे यापुढे सर्व महाराष्ट्रीय व इतर प्रांतांतील वाङ्मय नागरी लिपींतच छापलें जावें, म्हणजे अखिल हिंदी संस्कृति व भाषा यांच्या एकीकरणाचें कार्य सुकर होईल. यासाठी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांच्या मुख्य व जबाबदार संस्थांस नागरी लिपीचा मुद्रणांत उपयोग करण्यास विनंती करण्यांत यावी. (आ) तसेंच, इतर भारतीय भाषांच्या संस्थांशीं सहकार्य करून सर्व संस्कृतोत्पन्न भाषांसाठी देवनागरी लिपी नक्की करण्याकरिता महाराष्ट्र साहित्य परिषदेने एक समिति नेमावी व या समितीचा वृत्तान्त संमेलनाच्या पुढील अधिवेशनांत सादर करावा.

# परिषद् वार्ता

**कार्यकारी मंडळः—** ता. १५ एप्रिल १९३८ या दिवशीं मुंबईस भरलेल्या सभेंत वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर, या संस्थेस परिषदेशीं सलंग्न करून घेण्यांत आलें. संमेलनानंतर लागलीच संमेलन ठराव अंमलबजावणीचा विचार करण्यास मंडळाची बैठक १७ एप्रिल १९३८ या तारखेस भरविण्यांत आली.

१५ मे १९३८ या तारखेस भरलेल्या सभेंत कै. श्री. चिंतामण विनायक वैद्य यांच्या मृत्यूविषयी खालील दुखवट्याचा ठराव करण्यांत आलाः—

"विद्वत्कुलशेखर भारताचार्य श्री. चिंतामण विनायक वैद्य यांच्या मृत्यूमुळे महाराष्ट्र-साहित्याची अपरिमित हानि झाली आहे. संस्कृत पंडित व इतिहासज्ञ म्हणून त्यांची थोरवी केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांत मान्य झाली होती. डॉ. भांडारकर, लो. टिळक, अशा थोर प्राच्यविद्याविशारदांच्या तोडीचा व आजीव व्यासंग करीत राहणारा गाढ विद्वान महाराष्ट्रांतून हरपल्यामुळे या सभेस अत्यंत खेद होत आहे."

या बैठकींत भगिनीमंडळ, नागपूर, या संस्थेस परिषदेशीं संलग्न करून घेण्यांत आलें. जानेवारी ते मार्च या तिमाहीचा जमाखर्च सभेपुढे मांडण्यांत आला.

**संमेलनः—** अपेक्षेप्रमाणे मुंबईस भरलेलें २२ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन अत्यंत यशस्वीपणें पार पडलें. या संमेलनाचें वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे संमेलनाच्या अधिकाऱ्यांचें परिषदेशीं प्रेमळपणाचें व आपुलकीचें वर्तन. याचा परिणाम झाला तो असा की मुंबईस संमेलनाची परिषदेशीं तात्त्विक नसली तरी खरी एकात्मता दिसून आली. संमेलनांत झालेले ठराव या अंकांत इतरत्र प्रसिद्ध झाले आहेत. त्यांची अंमलबजावणी करण्यास आरंभ झाला आहे.

पुढील संमेलन अहमदनगर येथे भरविण्यास संमेलनाच्या शिफारशीप्रमाणे वाङ्मयोपासक मंडळ या संलग्न संस्थेस परवानगी देण्यांत आली. या संस्थेच्या कार्यकारी मंडळाच्या सभेने संमेलन ईस्टर सुटीनंतर पण जमल्यास शक्य तों रेल्वेच्या सवलतीच्या शेवटच्या तारखेच्या आंत भरविण्याचें ठरविलें आहे. स्वागतमंडळाच्या सभासदाची वर्गणी रु. २५ (अथवा अधिक), रु. १० व रु. ५ अशी ठेवण्यांत आली आहे व स्वागतमंडळाचे सभासद करून घेण्याच्या कामास आरंभ झाला आहे.

**इतरः—** उन्हाळ्याच्या सुटीनिमित्त पुण्यास आलेल्या बाहेरगांवच्या बऱ्याच साहित्यिकांनी परिषदेच्या कार्यालयास भेट दिली. ३० मे या तारखेस परिचय व विचारविनिमय या दृष्टीने कार्यालयांत रसपान झालें. त्या वेळीं पुण्यांतील परिषदेचे सभासद व बाहेरगांवाहून पुण्यास आलेले साहित्यप्रेमी मिळून सुमारें ऐंशी सद्गृहस्थ आले होते.

मुंबई विद्यापीठाच्या मराठीअभ्यासक्रम मंडळाची सभा ऑगस्टमध्ये होणार असून त्या वेळीं नवीन शुद्धलेखननियमांसंबंधी चर्चा करण्यास परिषदेने आपले प्रतिनिधि पाठवावे असें विद्यापीठाच्या रजिस्ट्रारकडून लिहून आलें आहे.

गेल्या वार्षिक साधारण सभेंत महाराष्ट्र साहित्य पत्रिका दर महिन्यास प्रसिद्ध होत जावी असा ठराव झाला आहे. या सभेपूर्वी भरलेल्या नियामक मंडळाच्या सभेने पत्रिका त्रैमासिक आहे असें धरूनच अंदाजपत्रक मंजूर केलें होतें. अंदाजपत्रकापेक्षा होणारा अधिक खर्च व इतर अडचणी यांची व्यवस्था लागल्यानंतर पत्रिका वार्षिक साधारण सभेच्या ठरावाप्रमाणे दरमहा प्रसिद्ध होत जाईल.

---

## नवीन सभासद

### आश्रयदाते

१ श्री. रमाबाईसाहेब आपटे, पुणें
२ श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजी

### साहाय्यक

३ डॉ. कु. श्री. म्हसकर, मुंबई

### हितचिंतक

४ श्रीमंत राजे बाळासाहेब मिरजकर, मिरज
५ श्रीमंत सौ. इंदिरा महाराणीसाहेब होळकर इंदूर
६ श्री. गं. वा. बोरगांवकर, कल्याण
(तहहयात वर्गांतून हितचिंतक वर्गात)
७ श्रीमंत राजे बाबाहेब पंतसाचिव, भोर
८ श्री. विठ्ठल दत्तात्रेय घाटे, मुंबई
९ प्रो. धनंजय रामचंद्र गाडगीळ, पुणें

### तहहयात

१० श्रीमंत सरदार रामचंद्र खंडेराव झनाने, इंदूर
११ श्री. कृष्णराव नारायणराव मालपेकर, मुंबई
१२ श्री. बापुराव साळवेकर, मुंबई
१३ श्री. विष्णु लक्ष्मण फडके, कल्याण
१४ श्रीमंत राणीसाहेब, कुरुंदवाड, कुरुंदवाड
१५ डॉ. परशुराम महादेव केतकर, पुणें
१६ श्री. रामचंद्र केशव बाळ, पुणें
१७ श्री. रामचंद्र काशिनाथ भिडे, पुणें
१८ प्रो. शंकर गोपाळ साठे, पुणें
१९ प्रो. विनायक गोपाळ गोखले, पुणें
२० रा. ब. कृष्णाजी नारायण भिडे, पुणें
२१ रा. ब. दत्तात्रेय लक्ष्मण सहस्रबुद्धे, पुणें
२२ श्री. विनायक अनंत आपटे, पुणें
२३ श्री. केशव विनायक केळकर, पुणें
२४ वैद्यराज पुरुषोत्तमशास्त्री गणेशशास्त्री नानल, पुणें

### साधारण

#### मुंबई

२५ प्रो. मनोहर भिकाजी चिटणीस
२६ श्री. दत्तात्रेय काशिनाथ कुलकर्णी
२७ श्री. परशुराम चिंतामण गद्रे

#### अमदाबाद

२८ श्री. मोरेश्वर नारायण देव
२९ श्री. विष्णु माधव देशपांडे
३० श्री. विनायक महादेव आपटे

#### इंदूर

३१ श्री. रघुनाथ केशव कापडे
३२ श्री. श्री. ना. शारंगपाणी
३३ सौ. भानूमतीबाई तर्खड
३४ श्री. कालिदास त्र्यंबक भाटे

#### कोल्हापूर

३५ श्री. विनायक दामोदर कर्नाटकी

#### जळगांव

३६ सौ. आनंदीबाई शिर्के

#### बडोदें

३७ श्री. कृष्णराव नारायण ठोंबरे

#### पुणें

३८ डॉ. दिनकर धोंडो कर्वे

#### लष्कर (ग्वाल्हेर)

३९ श्री. महादेव रघुनाथ टिकेकर

---

# संलग्न संस्था वृत्त

## स्नेह-संवर्धक संघ, मिरज

### एप्रिल १९३५ ते मे १९३८ अखेरचा वृत्तान्त

गेल्या तीन वर्षांत खालील चार विषयांवर निरनिराळ्या साहित्यिकांच्या अध्यक्षतेखाली चर्चा झाली:—

'बातमीदाराचें कर्तव्य', 'सताल पद्यरचना', 'मराठी-संस्कृत कोशाची आवश्यकता', व 'राष्ट्रगीताची चाल कोणती असावी?'

(१) शारदेचा दरबार व (२) राष्ट्रभाषा-दिग्दर्शन या दोन ग्रंथांचें प्रकाशन संघाकडून करण्यांत आलें.

संघाचें पहिलें व दुसरें संमेलन अनुक्रमें ता. १६।६।३५ व ९।५।३८ रोजीं भरविण्यांत आलें.

संघातर्फे (१) टीका-वाङ्मय, (२) हिंदीच्या अभ्यासाचें महत्त्व, (३) छंदोरचनेचा सगळा गोंधळ या तीन विषयांवर व्याख्यानें करविण्यांत आलीं.

---

# साभार स्वीकार

१ फेरीवाला-- लेखिका : गीता जनार्दन साने; प्रकाशक : कृ. ना. सापळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवन रोड, मुंबई ४; मूल्य १ रुपाया.

२ पराचा कावळा (नाटक)— लेखक : प्रल्हाद केशव अत्रे; प्रकाशक : यशवंत केशव अत्रे, सारस्वत वसाहत, पुणें १; मूल्य १ रुपाया.

३ बडोदें राज्य दप्तरांतील ऐतिहासिक वेंचे-खंड ४ था (गोविंदराव आणि आनंदराव–१७९९ ते १८१३) Published by Authority, State Records Deparment; मूल्य १-७-०.

४ श्रीभवानराव गौरव ग्रंथ-भाग ३ – प्रकाशक : पब्लिकेशन डिपार्टमेंट, संस्थान औंध, औंध.

५ इन्दु-विलास (भालेन्दु यांच्या निवडक कथांचा संग्रह) – लेखक व प्रकाशक : भा. सी. सुकथनकर (भालेन्दु), वाळकेश्वर क्रॉस लेन, मलबार हिल्, मुंबई ६; मूल्य– कापडी १॥ रु., कागदी १ रु.

६ नवी पालवी— लेखक : भा. म. गोरे, फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४; प्रकाशक : शं. न. जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणें २; मूल्य ८ आणे.

अनुक्रमणिका

७ गेल्या पाव शतकांतील गोमन्तक— (सारस्वत ब्राह्मण समाज, मडगांव, रौप्यमहोत्सव स्मारक ग्रंथ); संग्राहक : केशव अनंत नायक; मूल्य २ रु.

८ कलातरङ्ग— कर्ता : शशाङ्क; प्रकाशक : बाळकृष्ण मार्तंड दाभाडे, औंध (सातारा); मूल्य १ रु.

९ Victorious India by S. V. Ketkar; Published by S. Ketkar, M. D. Mandal, Poona 4.

१० इटुकल्या गोष्टी— लेखक व प्रकाशक : चिं. वि. जोशी, दांडया बाजार, बडोदें; मूल्य १। रु.

११ मराठी कादंबरी (तंत्र आणि विकास)— लेखक : प्र. वा. बापट, व ना.वा. गोडबोले; प्रकाशक : प्र. वा. बापट, व्हिक्टोरिआ कॉलेज, लष्कर (ग्वाल्हेर); मूल्य २॥ रु.

१२ शके १८६० का भारत विजय पञ्चांग— संपादक : ज्योतिषाचार्य वि. भू. पं. दीनानाथशास्त्री चुलैट, अध्यक्ष, पंचांग संशोधन कमिटी, इंदूर; मूल्य २। रुपये.

१३ विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचें चरित्र— लेखक : श्रीधर सखाराम पंडित; प्रकाशक : रा. ब. द. ल. सहस्रबुद्धे, पुणें; मूल्य १२ आणे.

१४ आधुनिक आंग्ल वाङ्मय– लेखक : भा. म. गोरे, प्रकाशक : शं. न. जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणें २; मूल्य १ रुपाया.

१५ श्रीविठ्ठल आणि पंढरपूर— लेखक व प्रकाशक : गणेश हरि खरे, भा. इ. सं. मंडळ, पुणें २; मूल्य ६ आणे.

१६ आमोक उर्फ वेडाभिसा (लघुकादंबरी)—अनुवादक : न. का. घारपुरे; प्रकाशक : तरुण साहित्यमाला, इंदूर; मूल्य १ रुपया.

———

ॐ भूयानसि महानसि

# कोंकणी-अहिराणीसमितीचा वृत्तान्त

अर्थात्

# कोंकणी-अहिराणी भाषांची विचिकित्सा



१. शके १८५६ ह्या वर्षी बडोदें येथे भरलेल्या १९ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाने कोंकणी-अहिराणी भाषेचा विचार करण्यासाठी खालील ठराव मंजूर केला. ठराव क्रम १९.

"सन १९३१ च्या खानेसुमारींत खानदेशी अगर अहिराणी व कोंकणी ह्या दोन प्रांतिक भाषा मराठीपासून पृथक् काढून त्या स्वतंत्र आहेत असें ठरविल्यामुळे मराठीभाषकांचें संख्याबळ घटणार, यासाठी या प्रांतिक भाषा मराठीच्याच उपभाषा आहेत कीं नाहीत हें ठरविण्यासाठी या संमेलनाने तज्ज्ञांची एक समिति नेमून तिजकडून अधिकृत मत पुढील अधिवेशनाकरता मागवावें."

ह्या ठरावास अनुलक्षून म. सा. परिषदेच्या ११-३-१९३५ च्या कार्यकारी मंडळाने कृ. पां. कुलकर्णी, वि. ह. निजसुरे, चिं. ग. कर्वे यांची समिति नेमली. ह्या ठरावाप्रमाणे समितीची घटना झाल्यानंतर रीतसर समितीच्या कामास सुरवात झाली. समितीच्या सदस्यांचीं नांवें जरी ठरावाप्रमाणे निश्चित केलीं होतीं तरी विषयाच्या पूर्ततेसाठी आणखी सदस्य स्वीकृत करण्यास परवानगी संमेलनाने दिली होती. त्याप्रमाणे समितीच्या सदस्यांच्या अनुमतीने श्री. ना. गो. चापेकर हे सदस्य म्हणून स्वीकृत केले.

ह्या समितीची घटना व तिचें कार्यक्षेत्र हीं म. सा. संमेलनाच्या व परिषदेच्या ठरावाने निश्चित केलींच होतीं. समितीच्या बैठका फार झाल्या नाहीत. बरेंचसें कार्य पत्रव्यवहाराने करावें लागलें. त्या त्या भाषांचीं अस्सल गमकें दाखविणारें साहित्य त्या त्या प्रांतांतून प्रत्यक्ष भाषकांकडून मिळवावें लागलें. निरनिराळे नमुने, म्हणी, लोकगीतें, वाक्प्रचार हीं गोळा करावीं लागलीं. हीं गोळा करून पाठविण्याचें काम त्या त्या प्रांतांतील सुबुद्ध व निर्विकारी अशा अभ्यासूंनी केलें आहे. अशा पुष्कळ अभ्यासूंचें समितीस बहुमोल साहाय्य झालें आहे. प्रश्नपत्रिका काढल्या. त्यांचीं जीं उत्तरें आलीं त्यांची छाननी केली. भरपूर व सबळ पुराव्यावर अधिष्ठित असलेलींच तेवढीं प्रमाणें निर्णयाच्या बाबतींत आधारास घेतलीं आहेत. ह्या सर्व प्रमाणांची कल्पना शेवटीं जोडलेल्या नमुन्यावरून येईल. प्रत्यक्ष नमुन्याप्रमाणे ह्या दोन्ही भाषांवर लिहिलेल्या ग्रंथांचाहि आम्हीं विचार केला आहे. ह्यावरून ग्रंथप्रमाणतेच्या विचाराची कल्पना येईल. ज्यांचें आम्हीं साहाय्य घेतलें त्या सर्वांची प्रस्तुत समिति अत्यंत ऋणी आहे. त्यांतल्या त्यांत ग्रीयर्सन्, ब्लोक, चांदोरकर, खानेसुमारीचे वृत्तान्त, कत्रे, कुलकर्णी, वांगडेकर, शणै गोंयबाब, प्रियोळकर, चव्हाण, सालढाना, फादर स्टीफन्स वगैरे ग्रंथकारांचा व लेखकांचा निर्देश करणें अत्यंत जरूर आहे. भाषाविचिकित्सेचा विषयच अत्यंत किचकट असल्यामुळे व ह्या दोन भाषांचा पसाराहि आवरणें जरा कष्टसाध्य असल्यामुळे समितीच्या वृत्तांतास विलंब लागला आहे. शास्त्रीय कार्य घाईत कर-

ण्यांत कांही फायदा नाही. साङ्ग व संपूर्ण विचारांचें अधिष्ठान जितकें भक्कम असेल तितकी निर्णयाची सबलता अधिक ह्या विचारानेच आजंवर वृत्तांत सादर करतां आला नाही.

## ह्या प्रश्न उद्भवण्याचीं कारणें

२. हिंदुस्थान सरकारने हिंदुस्थानांतील भाषिक पाहणी करण्याचें ठरविलें व त्यासाठी एक योजना तयार केली. भाषिक पाहणीच्या कामावर डॉ. जी. ए. ग्रियर्सन ह्या भाषापंडिताची नेमणूक केली. ह्या अधिकाऱ्याने आपणावर सोपविलेलें काम अत्यंत चोख रीतीने पार पाडिलें आहे असें त्याच्या कामावरून म्हणणें भाग पडतें. हिंदुस्थानांतील सर्व भाषांची आधुनिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने पाहणी करून प्रत्येक भाषेवर एक एक मोठा ग्रंथ डॉ. ग्रियर्सन ह्यांच्या संपादकीय पुरस्काराने हिंदुस्थान सरकारने प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथांत त्या त्या भाषेचे निरनिराळे प्रांतिक भेद, ते ज्या विभागांत बोलले जातात तेथील स्थूल माहिती, बोलणाऱ्या लोकांचा किंचितसा परिचय, त्या त्या प्रांतिक भेदाच्या विशेष लकबा, त्यांचें जरूरीपुरतें व्याकरण, व त्या त्या प्रांतिक भाषाभेदांचे नमुने, कांही विशिष्ट शब्दप्रयोग व वाक्प्रयोग अशी माहिती एकत्रित योग्य त्या परिष्कारासह त्या त्या ग्रंथांत निविष्ट केली. हिंदुस्थानांतील बऱ्याच भाषांची पाहणी खुद्द डॉ. ग्रियर्सननेच स्वतः केली आहे. ज्या भाषा त्याला विशेष परिचित नव्हत्या त्या भाषांची पाहणी त्या त्या भाषांतील जे तज्ज्ञ होते त्यांच्याकडून मुख्य संपादकाने आंखून दिलेल्या धोरणानुसार करवून त्याच्या सोपस्कारासह दिली आहे. मराठी भाषेची पाहणी 'हिंदुस्थानची भाषिक पाहणी' (Linguistic Survey of India) ह्या ग्रंथावलीच्या सातव्या ग्रंथांत दिली आहे. खुद्द डॉ. ग्रियर्सन ह्याचें मराठी भाषेचें परिशीलन नसल्यामुळे त्याच्या भाषाशास्त्रीय ज्ञानाचा, त्याच्या सूक्ष्म विचिकित्सेचा फायदा मराठी भाषेला जितका मिळाला असता तितका मिळाला नाही. मराठी भाषेचें काम त्याने ख्रिस्चियाना येथील भाषासंशोधक डॉ. स्टीन कोनौ ह्या विद्वानावर सोपविलें. डॉ. कोनौ ह्याने तें काम मोठ्या आस्थेने व जबाबदारीने करून पार पाडलें असें जरी असलें तरी काश्मिरी, हिंदी, नेपाळी इत्यादि भाषांवरील ग्रंथांत ज्याप्रमाणे सांगोपांग, सशास्त्रीय चर्चा पदोपदीं प्रतीत होते तशी मराठीवरील ग्रंथांत प्रतीत होत नाही हें म्हणणें भाग आहे. ह्या विद्वानाने मराठीच्या प्रांतभेदाची सूक्ष्म विचिकित्सा केली व ती करतांना त्याला असें आढळून आलें की खानदेश--पश्चिम व पूर्व, नाशिकचा उत्तरभाग, तापी नदीच्या खोऱ्यांतील दक्षिणेकडील भाग वगैरे प्रदेशांत जो भाषिक भेद बोलण्यांत आहे, जी लोकांची--विशेषतः अशिक्षित ग्रामिकांची--बोली म्हणून प्रचलित आहे तिच्यांत मराठी भाषेचीं लक्षणें सांपडण्याऐवजीं प्रामुख्याने गुजराती भाषेचीं लक्षणें विशेष आढळतात. तेव्हा ह्या विशिष्ट प्रांतांतील बोली मराठीचा प्रांतिक भेद न ठरतां तो गुजरातीचा प्रांतिक भेद ठरतो असें त्याचें मत झालें व त्याप्रमाणे त्याने मराठी भाषेवरील ग्रंथांत त्या प्रांतिक भेदाचा अंतर्भाव न करतां त्याचा गुजरातीचा प्रांतिक भेद म्हणून स्वतंत्र विचार करून तो वरील ग्रंथावलीच्या क्रमांक(९-३)मध्ये प्रसिद्ध केला. ह्या प्रांतिक भेदाचें नांव अहिराणी भाषा. ही भाषा बोलणारे लोक सामान्य दृष्टीने अहीर. ज्या अर्थी मराठीच्या गोतावळ्यांतून ही भाषा अलग झाली त्या अर्थी ही भाषा बोलणाऱ्या लोकांचीहि शिरोगणती गुजराती लोकांत होऊं लागली. ह्या भाषिक पुराव्याच्या आधारावरच १९११, १९२१, १९३१ ह्या सालांत झालेल्या शिरोगणतींत अहिराणी भाषा बोलणाऱ्या लोकांचा समावेश गुजराती

भाषेचा तो प्रांतिक भेद म्हणून मानिला गेला म्हणून–गुजराती लोकांच्यामध्ये झाला तितक्या संख्येने मराठी बोलणाऱ्या लोकांची संख्या शिरोगणतींत घटलेली दिसली. तेव्हां ह्या प्रश्नाचा शास्त्रीय विचार करणें प्राप्त झालें. ही एक गोष्ट.

३. ह्या भाषिक संशोधनाच्या प्रश्नास चालनां मिळण्यास आणखी एक कारण झालें. अहिराणीभाषकांचा अंतर्भाव गुजरातीभाषकांमध्ये झाल्यामुळे ज्याप्रमाणे मराठीभाषकांची संख्या घटली त्याचप्रमाणे दक्षिणेकडील कोंकणी भाषा बोलणाऱ्याची संख्या मराठी भाषकांच्या संख्येंतून काढल्यामुळे ती संख्या अधिकच घटली. वरून अहिराणी भाषेसंबंधी एक लचका तोडला तर खालून दक्षिणी कोंकणी भाषेसंबंधी दुसरा लचका तोडला. कोंकणीभाषकांची संख्या मराठी भाषकांच्या संख्येंत जमेस न घेतां स्वतंत्रपणें निराळी देण्याच्या मुळाशीं निराळीच विचारसरणी होती. अहिराणी भाषा ही मराठीचा प्रांतिक भेद न ठरतां गुजरातीचा प्रांतिक भेद ठरल्यामुळे ती गुजराती भाषेंत सामावली. कोंकणी भाषा आणि मराठी भाषा (म्हणजे अर्थात् केंद्रवर्ती मराठी भाषा) ह्या दोहोंमधील साम्य उघड उघड प्रतीत होण्यासारखें आहे. तेव्हां कोंकणी भाषेस दुसऱ्या कोणत्या तरी भाषेचा प्रांतिक भेद ठरविणें अशक्य होतें. तेव्हां तिचा अलग रीतीनें निर्देश करण्यांत विचारसरणी निराळी पाहिजे. कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा आहे, व त्या दृष्टीने शिरोगणतींत तिचा स्वतंत्र निर्देश होणें जरूर आहे अशी विचारसरणी त्याच्या मुळाशीं ठेवून कोंकणीचा निराळा स्वतंत्र निर्देश केला. केंद्रवर्ती मराठी ज्याप्रमाणे एक स्वतंत्र भाषा आहे, गुजराती ज्याप्रमाणे एक स्वतंत्र भाषा आहे, किंवा कानडी ही ज्याप्रमाणे स्वतंत्र भाषा आहे, त्याप्रमाणे कोंकणी हीहि एक स्वतंत्र भाषा आहे अशा प्रकारचा ह्या विचारसरणीचा रोंख आहे. अशीं हीं दोन कारणें प्रस्तुत प्रश्न उद्भवण्यास झालीं. ह्या वर सांगितलेल्या दोन्ही विचारसरणींनी अहिराणीभाषक आणि कोंकणभाषक लोकांची शिरोगणती स्वतंत्रपणाने होऊं लागली. मराठीभाषकांमध्ये त्यांचा अंतर्भाव जो व्हावयास पाहिजे तो झाला नाही. तितक्या प्रमाणाने मराठीभाषकांची संख्या घटली गेली. तेव्हा साहजिकच या ओहोटीचा विचार करणें प्राप्त झालें व भावनावश न होतां शास्त्राच्या दृष्टीने त्या त्या भाषेबद्दलच्या वरील विचारसरणीची भूमिका तपासण्याची जरूरी उत्पन्न झाली. शास्त्र जर त्यांच्या बाजूला असलें तर वृथा अभिमानास वश होऊन मराठीभाषकांमध्ये त्यांचा समावेश करण्याचा आग्रह धरावयाचा व त्या आग्रहाने प्रेरित होऊन संमेलनांत ठराव करावयाचा हें बरें नव्हे, म्हणून ह्या समितीची योजना झाली.

## मराठी भाषा व मराठा समाज

४. अहिराणी व कोंकणी ह्या भाषांच्या उत्पत्तीचा व त्यांचा मध्यमराठी भाषेशीं असलेल्या संबंधाचा विचार करतांना आपणांस मराठी भाषेच्या उत्पत्तीचा, मूळ मराठी भाषा बोलणाऱ्या समाजघटकांचा व मूळ मराठी भाषेच्या क्षेत्रांचा विचार करणें जरूर आहे. परंतु ह्या प्रश्नासंबंधी कांही सर्वथा मान्य असलेले असे निर्णय ह्या समितीस गृहीत धरून चालावें लागलें आहे. ह्या सर्व प्रश्नांचा विचार करणें हें जरूर असलें तरी अधिक विस्तृत असल्यामुळे तो विचार आम्हांस प्रस्तुत प्रकरणीं बाजूस ठेवावा लागला आहे. बीम्स, भांडारकर, ब्लोक, ग्रीयर्सन, कोनौ, राजवाडे, वैद्य, गुणे, कुलकर्णी वगैरे लेखकांनी ह्याबाबत जे विचार मांडले आहेत ते विचारांत घेऊनच आम्ही सदरील दोन भाषांचा प्रश्न हातीं घेतला आहे. मराठी भाषेचा

मूळचा प्रांत-वऱ्हाड, महाराष्ट्रीयांची वसाहत, मराठासमाजाची घटना, ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी, अथर्वण, गौड, द्राविड इत्यादि ब्राह्मण; राष्ट्रिक, वैराष्ट्रिक, महाराष्ट्रिक, त्रैकूटक, पांचाल, रूपजीविक, अश्मक, भोज, महाभोज, सत्तीयपूत, पेतेनिक, केरळपुत्त, पाण्डय, चोल इत्यादि क्षत्रिय; आभीर, काठी, राठी, गुह्यक इत्यादि वैश्य; नाग, महार, भिल्ल, कोंड, कातवडी, गावीत, वारली, कातकरी वगैरे शूद्र, अतिशूद्र ह्या सर्वांचा मिळून महाराष्ट्रांतील समाज बनला. त्या त्या घटकांच्या निरनिराळ्या प्राकृत, अपभ्रंश वगैरे भाषा मिळून मराठी भाषा बनली. मूळ आद्य महाराष्ट्रांतील कांही समाजघटक नर्मदा, तापी, गोदावरी या नद्यांच्या दक्षिणेस पूर्वेच्या व पश्चिमेच्या अशा दोन्ही बाजूंनी सरकल्या व खानदेश, कोंकणपट्टी, दक्षिण प्रांत ह्या भागांत त्या त्या भाषांसह जाऊन कायम होऊन बसल्या. मराठी भाषामंदाकिनीचा मंदमंद वाहणारा प्रवाह कोणत्या स्थानापासून व कोणत्या कालापासून अविरत, अखंड असा वाहत आहे, ह्या तिच्या दूरच्या प्रवासांत केव्हा व किती तिची अवस्थांतरें झालीं, किती लोकांनी मोठ्या भाविकश्रद्धेने व आत्मिक भावनेने तिच्या साह्याच्या जोरावर आपलें जीवित चालविलें, कोणकोणते प्रांत हिच्या प्रवाहाच्या शाखांनी पूनित केले, किती अनन्यभक्तांनी तिची सेवा आराधना करून ऐहिक व पारत्रिक सुख संपादिलें व तिची महती वाढविली ह्या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. परंतु ह्या सर्व प्रश्नांचा केवळ उल्लेखच करणें शक्य आहे. ह्या भाषांचा व भाषकांचा विचार करण्यास व त्यासंबंधीच्या निर्णयास खंविरी येण्यास ह्या वर निर्दिष्ट केलेल्या प्रश्नांचा उपयोग होईल हें मात्र खास. मराठासमाज हा निरनिराळ्या काळांत उत्तरेकडील आर्यांचा समाजसमूह जे दक्षिणेंत येऊन स्थायी झाले त्यांचा बनला. मूळचे एतद्देशीय लोक, द्राविडी लोक, आर्य लोक, व आणखी कांही परके समाज ह्या सर्व घटकांचा मिळून दक्षिणेंतील मराठासमाज बनला. ह्या समाजांत आर्यसमाजाचें प्रमाण मात्र इतरांपेक्षा अधिक होतें. संस्कृति, पराक्रम, धर्म, कष्टशीलत्व इत्यादि गुण त्यांच्यांत प्रामुख्याने असल्यामुळे इतर सर्व समाजघटकांपेक्षा तो प्रभावी झाला ह्यांत नवल नाही. त्यांची भाषा ही महाराष्ट्राची सर्व समाजाची भाषा बनली. उत्तरेकडून आलेले लोक हे सर्व आर्यवंशाचे असले तरी ते निरनिराळ्या प्रांतांतून आल्यामुळे त्यांच्या भाषा परस्परभिन्न होत्या; प्रत्येक समाजघटकाची भाषा निराळी असा प्रकार होता. ह्या सर्व भाषांच्या मिश्रणाने मराठी भाषा बनली. मराठी भाषेच्या पूर्वी दण्डकारण्यांत सर्व ठिकाणीं जरी नाही तरी बऱ्याच मोठ्या भागांत कानडीसारखी एखादी द्राविडी भाषा रूढ होती. मराठासमाजाचें जसजसें प्राचुर्य वाढूं लागलें तसतशी मराठी भाषा अधिक स्थिर, विस्तृत, जानपद अशा स्वरूपाची होऊं लागली. मराठासमाजांत माहाराष्ट्रीभाषक व अपभ्रंशभाषक ह्यांचा भरणा विशेष असल्यामुळे मराठी भाषेंत माहाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांचे स्वभावविशेष फार उतरलेले असल्याचें आढळतें. इतर भाषांचेहि क्वचित् क्वचित् विशेष आढळतात. तेव्हा मराठी ही आर्यभाषा आहे ह्यांत शंका नाही. ती प्राकृतोद्भव आहे, ती मराठासमाजाची भाषा आहे. ती भाषा बोलणारा समाज कांही विशिष्ट संस्कृतिविशेषांनी एकत्र बांधला आहे. तेच संस्कृतिविशेष प्रस्तुत अहिराणी व कोंकणीभाषकांच्या मध्ये आढळून येतात. एकंदर मराठी भाषकांची संख्या दोन कोटि अठरा लक्ष अठरा हजार एकशें सत्तर आहे. ह्यांत मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वऱ्हाड, निजाम राज्यांतील मराठवाडा, मलबार व मंगलोर हे दोन मद्रासेकडील जिल्हे, कोचीन व त्रावणकोर हीं संस्थानें इतका प्रांत येतो. मराठी भाषेच्या भोंवताली उत्तरेस हिंदी, उरीया, राजस्तानी, गुजराती, भिल्ली; पूर्वेस उरिया, उर्दू, तेलगू; दक्षिणेस कानडी वगैरे भाषा असें निरनिराळ्या भाषांचें वलय आहे. ह्या भाषा बोलणारे समाज मराठासमाजा-

त्या भोंवती वावरतात व संस्कृतिदृष्ट्या कांही वेळां अगदी लगतलगतचे लोक परस्परसमाजांत सामावूनहि जातात. अशी ही प्रक्रिया फार होऊं लागली म्हणजे सर्व बाबींवर त्याचा परिणाम होतो. तसा कांही प्रकार अहिराणी-गुजराती, कोंकणी-पोर्चुगीज-कानडी, देसूर-कानडी हळवी हिंदी, नागपुरी–हिंदी व उत्कल ह्या भाषांच्या जोड्यांतील परस्परभाषेवर झाला आहे. मुख्य भाषा मराठी. महाराष्ट्रांतील बहुजनभाषा, राजभाषा, धर्मभाषा (कांही वेळा), व्यवहारभाषा, वाङ्मयीन भाषा, लेखनिविष्टभाषा, ग्रंथभाषा वगैरे सर्व दृष्टींनी युक्त अशी मराठी भाषाच समजली जाते. हिंदुस्थानांतील इतर सर्व आधुनिक भाषांच्या बरोबरीने मराठी भाषा वावरत आहे; तिच्यांत कोणत्याहि दृष्टीने उणेपणा नाही. हिंदी, बंगाली, गुजराती ह्या भाषांबरोबर किंवा कांही बाबतींत अग्रेसर अशीच मराठी भाषा वावरते. इतिहास, रूढि, वाङ्मय, संस्कृति वगैरे सर्व बाबी तिच्यांत पुरेपूर व अस्सल व उच्च दर्जाच्या आढळतात. ह्या सर्व दृष्टींनी मराठी भाषा ही एक हिंदुस्थानांतील अग्रभागीं असलेली सुसंपन्न अशी भाषा आहे हें खास; ती दुसऱ्या कोणत्याहि भाषेच्या अंकित नाही.

महाराष्ट्राच्या परिसरवर्ती जें मराठी भाषेचें स्वरूप आहे तें अन्य भाषांच्या सांनिध्यामुळे विकृत झालेलें आहे. ही विकृति कांही कांही वेळां अधिक झाली म्हणजे त्या मूळ भाषेच्या स्वरूपाबद्दल संभ्रम उत्पन्न होतो. अहिराणी म्हणून जी खानदेशांत बहुजनसमाजाची भाषा रूढ आहे तिच्या स्वरूपाबद्दल असाच संभ्रम उत्पन्न होण्याइतकी विकृति झाली आहे. ही विकृति कोणत्या कारणांमुळे झाली, ती कोणत्या स्वरूपाची आहे, तिच्यांत अन्य भाषांचा भाग किती आहे व शेवटीं ह्या विकृतीने मूळ भाषेचा मूळ स्वभावच पालटला आहे कीं काय ह्याचा विचार पुढे केला आहे. खानदेश, त्या देशांतील लोक व भाषा, अहिराणी भाषा, तिचे स्वभावविशेष, तिचे नमुने, त्यांतील मराठीपणा वगैरे बाबी पुढें क्रमाने विवेचिल्या आहेत. शेवटीं निर्णय दिले आहेत.

## खानदेशांतील लोक

५. अहिराणी भाषा ही मुख्यतः खानदेशांत बोलली जात असली तरी तिचा प्रदेश खानदेशापेक्षा बराच विस्तृत आहे. साधारणपणें ह्या भाषेचें क्षेत्र पूर्व व पश्चिम खानदेश हे दोन जिल्हे, दक्षिणेकडे नाशिक जिल्ह्याची उत्तरहद्द व उत्तरेकडील बऱ्हाणपुरापर्यंतचा प्रदेश इतकें विस्तृत आहे. आता ह्या विस्तृत क्षेत्रांत निरनिराळे लोक वसाहती करून राहिलेले आढळतात. मराठीचें मूळ क्षेत्र जें वऱ्हाड (विदर्भ) त्याच्या निकटवर्ती हा देश असल्यामुळे हा प्रांत फार प्राचीन काळीं वसला असला पाहिजे. दण्डकारण्याच्या आरंभाचाच हा प्रांत असल्यामुळे दक्षिणेकडे वस्ती होण्याच्या अगोदर नर्मदा खोरें व्यापिल्यानंतर तापी, गिरणा, पांजरा, गोदावरी, प्रवरा ह्या नद्यांच्या खोऱ्यांतील प्रांत वसला असला पाहिजे. दण्डकारण्याच्या वसाहतकर्मांत ज्या ज्या समाजघटकांनी भाग घेतला त्याच समाजघटकांनी खानदेशाच्या वसाहतकर्मांत भाग घेत असला पाहिजे हें उघड आहे. मराठासमाज ज्या काळीं व ज्या समाजघटकांच्या मार्फत बनला त्याच काळीं व त्याच समाजघटकांमार्फत खानदेशी समाज बनला आहे. धर्म, समाजरीति, आचारविचार, अन्नपोषाख, मतेंसमजुति, संस्कारविधि वगैरे संस्कृतिदर्शक ज्या ज्या म्हणून निरनिराळ्या बाबी आहेत त्या सर्वांत हा खानदेशी समाज वर्धा नदीच्या खोऱ्यांतील समाजाशीं किंवा दक्षिणेकडील गोदावरीप्रवरा, भीमानीरा किंवा कृष्णाकोयना ह्या नद्यां-

च्या खोऱ्यांतील समाजाशीं जितका एकरूप किंवा समरूप दिसतो तितका तो नर्मदा, साबरमती ह्या नद्यांच्या खोऱ्यांतील समाजाशीं एकरूप किंवा समरूप दिसत नाहीं ही गोष्ट ह्या लोकांची भाषानिर्णयाच्या बाबत अत्यंत महत्त्वाची आहे. समाजाचें संस्कृतिअधिष्ठान हें त्याच्या भाषा-अधिष्ठानास बरेंच कारणीभूत होत असतें. ह्या प्रांतांतील वसाहतकर्मांत ब्रह्मकर्मे, यजुर्वेदी ब्राह्मण, ऋग्वेदी ब्राह्मण, क्षात्रकर्मे निरनिराळीं क्षत्रिय कुलें व कृषिकर्मे; कांहीं विट्समाज ह्यांनी प्रधानरीत्या भाग घेतला. वसाहतकर्मास एकदा ह्यांनी सुरवात केल्यानंतर ह्यांनी आपल्या सोयीसाठी निरनिराळ्या तद्देशीय समाजाबरोबर इतर कांहीं परदेशी समाजांचा उपयोग करून घेतला. कार्षकर्म प्रथम प्रथम मूळ तद्देशीय लोक व इतर बुभुक्षु लोक ह्यांच्यामार्फतच लोकांनी करून घेतलें. तद्देशीय लोकांत भिल्ल, ठाकूर, कोंड, कातकरी, वारली इत्यादि लोक होते. खानदेशाच्या उत्तरभागांत, तापीनर्मदा ह्या नद्यांच्या खोऱ्यांत व विंध्य सातपुड्याच्या डोंगर खबदाडींत ह्या लोकांची वस्ती वसाहतवाल्यांच्या अगोदरपासून होती. बाहेरच्या दुसऱ्या लोकांत आभीर लोकांचा आपणांस विशेष उल्लेख केला पाहिजे. ह्या आभीर लोकांचाच विशेष भरणा—आणि तोहि समाजांतील नीच थरांवरील समाजांत—आहे. ह्यांनाच अहीर असें पुढे संबोधण्यांत येऊं लागलें. उत्तरेकडून जे जे कांहीं निरनिराळे समाज दाक्षिणेंतील समाजांत येऊन एकरूप झाले त्यांत आभीर हा समाज मुख्य होय. हे मूळचे, पंजाब सिंध मधील. मध्यदेशांतील मथुरा प्रांतांतहि ह्यांची वस्ती होती हिंदुस्थानच्या वायव्येकडे सिंधु-नदीच्या तीरावर आभीर लोक राहत असत अशाबद्दल महाभारतामध्ये (२.३२.११९२) उल्लेख आहे. त्यांचा व तत्कालीन आर्यांचा फारसा सलोखा नव्हता. ह्यांच्या दुष्टाव्यामुळेच आर्यांची सरस्वती नदी एकदम अदृश्य झाली. ह्यांची जात दस्यू व ते युद्धप्रिय होते. द्रोणाचार्यांच्या सुपर्णव्यूहांत ह्यांना प्रमुखस्थान दिलें होतें. आभीरांनी अर्जुनावर पंचनदांत हल्ला केल्याचा उल्लेख आहे. ऐतिहासिक काळांतील वाङ्मयांतहि आभीरांचा उल्लेख ठिकठिकाणीं आला आहे. रुद्रसिंहाचा (१८१ इ. स.) सेनापति रुद्रभूति, शिवदत्ताचा मुलगा ईश्वरसेन (३०० इ. स.) असे पूर्वीचे उल्लेख सांपडतात. अहीरवाड (झांशी), अहारवाड (सं. प्रांत) ह्या नांवांवरून आभीरांची वस्ती संयुक्त प्रांतांतहि असावीसें वाटतें. नाशीकजवळचे त्रैकूटक राजे हे आभीरांपैकीच असावेत. ह्या सर्व पुराव्यावरून आभीर लोकांची ह्या प्रांतांतील वसाहत फार जुनी आहे, व त्यामध्ये ते क्षात्रकर्म व कार्षकर्म किंवा विट्कर्म अशा दोन्ही धंद्यांत भाग घेत होते. खानदेश वगैरे प्रांतांत मराठा व कुणबी ह्या दोन्ही थरांवरील लोकांच्यामध्ये ह्यांचें मिश्रण झालें असलें पाहिजे. हें सध्याच्या भाषिक पुराव्यावरून सिद्ध होतें.

## खानदेशांतील भाषा

६. खानदेशाच्या मर्यादा वर सांगितल्या, व तेथे वस्ती करून राहिलेल्या लोकांच्या जातींचा स्थूल निर्देश वर केला. लोकांनंतर त्यांच्यामध्ये रूढ असलेल्या बोलींचा विचार येतो. खानदेशाच्या क्षेत्रफलाच्या मानाने तेथें भाषा पुष्कळ रूढ आहेत. भाषांची संख्या व त्यांचे प्रकार पाहिले म्हणजे आश्चर्य वाटतें. भाषेच्या विविधतेंत ह्या देशाची तुलना युरोप-मधील आस्ट्रिया-हंगेरी ह्या देशाशीं करतां येईल. उत्तर हिंदुस्थानांतून दक्षिणेकडे येण्यास निघालें असतां, दक्षिणेच्या तोंडाशीं हा देश प्रथम लागतो; त्यामुळे निरनिराळ्या भाषा वापरणारे संघ दक्षिणेकडे ज्या वेळीं आले, त्या वेळीं प्रथम ह्या देशांत त्यांचा मुक्काम झाला असावा

व त्यांच्यापैकी कांही समाज ह्या देशांत आपल्या भाषेसह राहिला असावा. असेंच कांही तरी अनुमान ह्या देशांतील भाषावैविध्यावद्दल काढणें शक्य आहे. ह्या देशांत मराठी ही मुख्य भाषा आहे. त्या मराठीचे निरनिराळे प्रांतिक भेदहि त्या त्या प्रांतविशिष्ट लोकसमाजांत रूढ आहेत. उत्तर खानदेशांत वऱ्हाडी हा प्रांतिक भेद रूढ आहे. मध्यमराठी भाषा वरच्या दर्जाच्या लोकांत रूढ आहे. यजुर्वेदी व ऋग्वेदी ब्राह्मण, उच्चवर्गीय मराठे व इतर उच्च संस्कृतीच्या लोकांत मध्य मराठी किंवा पुणेरी मराठी रूढ आहे. कुणबी, लेवापाटीदार ह्यांच्यामध्ये अहिराणी भाषा रूढ आहे. ह्यांशिवाय नीच संस्कृतीच्या निरनिराळ्या थरांवरील लोकांत अहिराणी भाषेचे पोटभेद वापरांत आहेत. गवळी, गावित, मावची, गुजरा, कायली, कायणी, खोडी, कताली हे सर्व पोटभेद निरनिराळ्या पोटजातींमध्ये थोड्याफार फरकाने चालू आहेत. ह्यांच्याहिपेक्षा खालच्या थरांवरील लोकांत पुन्हा दुसऱ्याच भाषा चालू असल्याचें आढळतें. खानदेशामध्ये भिल्ल, वंजारी, रांगडी, कोल्हाटी, डोंबारी वगैरे हीन संस्कृतीच्या तरतमत्वाप्रमाणे वावरणाऱ्या पुष्कळ जाती आहेत. त्यांशिवाय द्रविड संस्कृतीच्या खालच्या थरांतील कांही जाती आपल्या भटक्या वृत्तीला अनुसरून आज येथे तर उद्या तेथे अशा रीतीने आपापल्या भाषांसह भटकत असतांना आढळतात. त्यांच्या जिप्सि वर्गाच्या भाषा पुनः निराळ्याच. एकट्या भिल्ल जातींत ढाकी, ढोरी, गावित, भेवास, वसव वगैरे भाषा रूढ आहेत. वंजारी लोक पजनारी भाषा बोलतात, तर रानटी लोक राजस्तानीमिश्र रानटी किंवा रांगडी भाषा बोलतात. डोंबारी लोक कानडीमिश्र किंवा तेलगूमिश्र डोंबारी किंवा कोल्हाटी भाषा बोलतात. अहीर लोकांच्यापैकीच गवळी, गावित हे लोक परंतु त्यांच्या भाषा मात्र किंचित् भिन्न गवळी व गावित अशा आहेत. खानदेशापैकी जो भाग ज्या इतरभाषीय प्रांतांशीं संलग्न झालेला आहे त्या भागांतील भाषा त्या त्या निकटवर्ती भाषांनी किंचितशी अभिभूत झालेली आहे. पश्चिम, उत्तर, वायव्य ह्या भागांकडील भाषांचा गुजराती, राजस्तानी, भिल्ल ह्या भाषांशीं संबंध आल्यामुळे त्यांचा परिणाम खानदेशांतील त्या त्या भाषांवर झालेला आहे. तसेंच हिंदी, आवढी, वऱ्हाडी, नेमाडी ह्याहि भाषांचा परिणाम त्या त्या दिग्वर्ती खानदेशी भाषांवर झाला आहे. दक्षिणेकडे व पूर्वेकडे मध्यमराठी, तेलगू, उर्दू ह्या भाषांचाहि परिणाम त्या बाजूच्या खानदेशांतील भाषांवर झाला आहे. खानदेशांतील भाषांमध्ये जे भिन्न भिन्न भाषांचे अवशेष किंवा खुणा आढळून येतात त्याचें कारण हें भिन्न भिन्न भाषांचें निकटवर्तित्व आहे. कोंकणस्थ व देशस्थ ब्राह्मणांची मध्यमराठी, त्यांच्या वाले लोकांची कोंकणी, यजुर्वेदी ब्राह्मणांची नगरी मराठी, मराठ्यांची ग्रामीण मराठी, लेवापाटिदारांची खानदेशी, कुणब्यांची अहिराणी, रजपुतांची चितोडी, ढाक्यांची ढाकी, धनगरांची धानकरी, गवळ्यांची गवळी, गारोळ्यांची गारोडी, कोल्हाट्यांची कोल्हाटी, गुजरांची गुजरा, शहादेकरांची कायली व कायणी, भिल्लांची भेवाशी, ढोरी, ढाकी, नवापूर भिल्लांची वसव, रांगड्या रजपुतांची रानटी किंवा रांगडी, उलेरखंडी, जंगली लोकांची कताली, वंजाऱ्यांची पजनारी, पश्चिम खानदेशांतील भिल्लांची नायरी, असें हें खानदेशांतील भाषाजंजाल थोड्याफार फरकाने त्या त्या लोकांच्या वापरण्यांत आहे.

## अहिराणी भाषा

७. खानदेशांतील समाज व त्यांच्या भाषा ह्यांचा विचार येथवर झाला. आता ह्या

भाषांपैकी मुख्य प्रस्तुत जी अहिराणी भाषा हिचा विचार करूं. अहिराणी ही अहिरांची भाषा. अहिर म्हणजे प्राचीन आभीर नांवाचा पशुचारणजीवी समाज व तो फार प्राचीन काळीं पंजाब, सिंध, संयुक्तप्रांत वगैरे ठिकाणीं राहत होता. तेथून कांहीं कालाने तो समाज अभिनिष्क्रमण करून दक्षिणेंत आला व त्याने खानदेशामध्ये वसाहत केली. त्या समाजापैकी एक टोळी पुढे पश्चिममार्गाने कोंकणांत घुसली व तेथे स्थायी झाली. ह्याचा कोंकणी भाषेवर काय परिणाम झाला हें पुढे 'कोंकणी' ह्या भाषेचा विचार करतांना पाहूं. आभीरसमाजाची मूळ भाषा अपभ्रंश. अपभ्रंश भाषा या प्राकृत भाषांच्या नंतर आणि अर्वाचीन बोली सुरू होण्याच्या पूर्वी अशा मधील काळांत सुरू होत्या. अपभ्रंश भाषा बोलणारा समाज पंजाब, सिंध, गुजरात, खानदेश व कोंकण ह्या प्रांतांत निरनिराळ्या काळीं वसती करून राहिल्यामुळे अपभ्रंश भाषेचा परिणाम त्या त्या देशांतील सध्याच्या बोलीवर झालेला दिसतो. किंबहुना पंजाबी, सिंधी, गुजराती, खानदेशी, कोंकणी (मराठी) ह्या सर्वांचें मूळ अधिष्ठान अपभ्रंश भाषाच होत. ह्या सर्व भाषा अपभ्रंशोद्भूत भाषा आहेत असें कांही विद्वान समजतात व तें बऱ्याच अंशीं साधार व सशास्त्र आहे. अपभ्रंश भाषा मोठ्या विस्तृत अशा क्षेत्रांत बोलली जात असल्यामुळे व बोलणारा समाज हा भटक्या वृत्तीचा असल्यामुळे अपभ्रंश भाषेंत बेसुमार बारीकसारीक भेद झाले. ह्या सर्वांचा निर्देश पूर्वीचे व्याकरणकार करतात. एखादी भाषा बोलणारा समाज वसाहतकर्मांत आज येथे तर उद्या तेथे अशा भटक्या वृत्तीचा असला म्हणजे त्याच्या भाषेंत बदल फार होतो. तिच्यामध्ये लवचिकपणा फार येतो. तसा प्रकार अपभ्रंश भाषांचा झाला आहे. अपभ्रंश भाषेचे जे सत्तावीस प्रकार प्राकृतचंद्रिकेंत निर्देशिले आहेत त्यांच्या मुळाशीं हीच वृत्ति आहे. अपभ्रंश भाषेचे मुख्य प्रकार तीन—व्राचड, नागर, व उपनागर. ह्याचे पुनः टाक्क, मालवी, पांचाली, वैदर्भी, लाटी, औड्री, कैकेयी, कौन्तली, पाण्ड्य, सैंहिली, कालिंगी, प्राच्या, आभिरी, कार्णाटी, मध्यदेशी, गैर्जरी, पाश्चात्या, द्राविडी, वैतालिकी, काञ्ची इत्यादि प्रकार कांही देशभेदाने तर कांही जातिभेदाने रूढ झाले होते. त्या त्या प्रांतांत सध्या ज्या बोली सुरू आहेत त्या बोलींचें मूळ किंवा अधिष्ठान ह्या अपभ्रंश भाषा होत. व ह्या भाषांपैकी कोणत्याहि भाषेच्या मुळाचें संशोधन करावयास लागलें म्हणजे जो भाषासंभ्रम होण्याचा संभव असतो त्याचें कारण हें होय.

८. अपभ्रंश भाषा ह्या मूळ आर्य. पाश्चात्य विद्वान आर्य भाषांना इंडो युरोपियन, इंडो आर्यन अशीं नावें देतात. आम्ही आर्य हें नांव देतों; व हें नांव त्या सर्व नांवांपेक्षा अधिक शास्त्रीय आहे. ह्या भाषांच्या 'आर्यभारती' ह्या भाषाविभागापैकीं संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व अर्वाचीन बोली आहेत. ह्या भाषांचा पुनः दक्षिण, मध्य, पूर्व व पश्चिम असे दिग्विभागावरून विभाग पडतात. व ते संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश भाषा बोलणारे समाज ज्या ज्या काळांत वसाहतकर्मासाठी पुढे सरकले त्या काळावरून पडतात. त्यांचे पुनः आंतर्प्राकृत, व बहिःप्राकृत असे मुख्य भाग आहेत. ह्या दोन प्राकृतप्रकारांपासून निरनिराळ्या आधुनिक बोली उद्भवल्या. हिंदी, राजस्तानी, गुजराती ह्या आंतर्प्राकृतपासून निघाल्या. मराठी वगैरे बहिःप्राकृतपासून निघाल्या. ह्या दोन प्राकृतांच्या कांही ठळक अशा खुणा आहेत. श् ष् स् ह्या तिन्ही वर्णांबद्दल आंतर्भाषेंत स् येतो. भूतकाळच्या रूपांत पदाचें लिंग, वचन बदलून पुनः कर्त्याचा दर्शक असा सार्वनामिक प्रत्यय लावतात. अहिराणी भाषा ही ह्याबाबत आंतर्प्राकृतच्या खुणा प्रतिबिंबित करण्याच्या ऐवजी मराठीप्रमाणे बाह्यप्राकृतच्या खुणा प्रतिबिंबित करते. मुख्य गोष्ट मूर्धन्य 'ळ्'बद्दल 'य्' अर्धस्वर करण्याची प्रवृत्ति ही अहिराणीची जी

मुख्य खूण ती गुजरातीच्या प्रकारांत आढळून येत नाही. ती प्रवृत्ति भिल्लीच्या कांहीं प्रकारांत व मराठीची दुसरी एक पोटभाषा जी कोंकणी तिच्या कांहीं प्रकारांत आढळून येते. कोंकणींमध्ये मूर्धन्य 'ळ'चा 'ल' असा अघर्षर करतात. हें एक परस्परअवछिन्न असें महत्त्वाचें चिन्ह आहे. ह्याचा आमच्या दृष्टीने अर्थ असा. पशुचारणजीवी आभीर ज्या वेळीं वसाहतकर्मासाठी वरून अभिनिष्क्रमण करूं लागले त्या वेळेस त्यांचा एक पुंज खानदेशांत स्थायी झाला व दुसरा पुंज कोंकणांत स्थायी झाला. त्याचे अवशेष त्या त्या लोकभाषांमध्ये आढळून येतात. त्याचप्रमाणे ह्या दोन भाषांना साधारण अशी दुसरी खूण म्हटली म्हणजे 'न्'संबंधाची होय. मूर्धन्य 'ण्' ह्या व्यंजनाबद्दल दन्त्य 'न्' वापरण्याचा विशेष कोंकणी आणि अहिराणी ह्या दोन्ही भाषांत आढळून येतो. हे दोन्ही विशेष गुजराती भाषेमध्ये त्या प्रमाणांत व त्या त्या ठिकाणीं आढळून न आल्यामुळे व कोंकणी मराठींत आढळल्यामुळे अहिराणी भाषेचा संबंध गुजरातीशीं न ठरतां कोंकणी भाषेशीं ठरतो हें उघड आहे. शब्दसाम्यापेक्षा प्रत्ययसाम्य हें बलवत्तर व प्रत्ययसाम्यापेक्षा देखील वर्णप्रक्रियेंतील साम्य हें बलवत्तम प्रमाण भाषाशास्त्राच्या दृष्टीने मानतात.

मानवशास्त्र, इतिहास, सामाजिक घटना, सांस्कृतिक अधिष्ठान वगैरे बाबतींत अहिराणीभाषक हे गुजरातीभाषकांच्यापेक्षा मराठी भाषकांना अधिक संबद्ध दिसतात हें आम्हीं इतरत्र सिद्ध केलेंच आहे.

## अहिराणीभाषकांची संख्या

९. अहिराणी भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या निश्चित करणें बरेंच प्रयासाचें काम आहे. सरकारी शिरोगणतीमध्ये जे आंकडे दिले आहेत त्या आंकड्यांचा आणि डॉ. ग्रियर्सनने आपल्या भाषिक पाहणीच्या ग्रंथांत दिलेल्या आंकड्यांचा मेळ बसत नाहीं. दोन्हींमध्ये फार तफावत आहे. भाषेसंबंधी व त्यांत पुनः ह्या अहिराणी भाषेसंबंधी धोरण निश्चित न झाल्यामुळे प्रत्येक खानेसुमारीच्या वेळीं अहिराणीभाषकांचे जमा केलेले आंकडे हे फार तफावत दाखवितात. इ. स. १९०१ च्या खानेसुमारींत अहिराणी भाषा बोलणारांची संख्या खानदेशांत २०२१ फक्त दिली आहे. १९११ च्या खानेसुमारींतहि हा आंकडा फारसा चढलेला दिसत नाहीं. डॉ. ग्रियर्सनने मात्र अहिराणीभाषकांचा आंकडा १२५३०६६ असा दिला आहे. ह्या तफावतीवरून हें स्पष्ट अनुमान निघतें कीं, खानेसुमारीच्या वेळेस अहिराणीभाषकांची गणति सांगणाऱ्याच्या अथवा लिहून घेणाऱ्याच्या चुकीने निराळ्याच सदराखालीं समाविष्ट केली असावी. एक तर त्यांनीं आपली भाषा मराठी असल्याचें सांगितलें असावें किंवा त्यांचा समावेश गुजरातीभाषकांमध्ये झाला असला पाहिजे.

साधारणपणें अहिराणीभाषकांची संख्या साडेबारा लाखांच्या सुमारास आहे. ह्यांपैकीं दहा लाख पन्नास हजार इतके खानदेशांत आहेत. त्यांतील चार लाख इतके कुणबी आहेत. एक लाख पंचवीस हजार इतके नाशिक जिल्ह्यांत आहेत. बेचाळीस हजारांपर्यंत लोक नेमाड प्रांतांत आहेत. ह्याशिवाय सुरगाण, बुलढाणा, अकोला ह्यांहि प्रांतांत तुरळक तुरळक अहिराणीभाषक आढळून येतात.

अहिराणी भाषेच्या मुख्य दोन पोटभाषा आहेत : एक ढांगी व दुसरी रंगारी. त्यांत ढांगीभाषक एकतीस हजार सातशे व रंगारीभाषक छत्तीसशे तीस आहेत. ह्या सर्वभाषकांची एकुणांत बेरीज केली तर बारा लाख त्रेपन्न हजार सहासष्ट इतकी आहे.

# अहिराणी भाषेची विचिकित्सा

मराठी भाषा, मराठा समाज, खानदेशांतील समाज, खानदेशांतील भाषा, अहिराणी-भाषक इत्यादि मुद्यांचा एथवर विचार झाला. आता प्रत्यक्ष भाषेची शास्त्रीयदृष्ट्या विचिकित्सा करून तिच्या अस्थिमांसरक्तामध्ये इतर भाषांचा आणि मराठी भाषेचा अंशभाग किती आहे तें पाहूं. भाषेची विचिकित्सा करतांना शब्द, उच्चार, प्रत्यय, प्रयोग ह्यांचा विचार करावा लागतो. मनांतील विचार प्रदर्शित करतांना कोणत्या शब्दसमूहाचा उपयोग करतात, ते शब्द कसे उच्चारिले जातात, ते शब्द परस्पर कसे अन्वित केले जातात, शब्दांच्या अन्वयप्रयोगाची धाडणी कशी ठेविली जाते, वाक्प्रचार कसे वापरले जातात इत्यादि बाबी भाषेच्या तपासणींत मुख्य आहेत. हींच विचिकित्सा उच्चारप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, प्रयोग-प्रक्रिया, शब्दसमूह व वाक्प्रचार ह्या मुद्यांच्या अनुरोधाने केल्याशिवाय तिला शास्त्रीय स्वरूप येणार नाही. अहिराणी भाषेची ह्या मुद्यांच्या अनुरोधाने विचिकित्सा केली आहे. अहिराणी भाषेचे प्रत्यक्ष चालू असलेले नमुने गोळा करून त्यांची सूक्ष्म तपासणी केल्याशिवाय ही भाषेची चर्चा पूर्ण व साधार होणार नाही. तेव्हा प्रथम अहिराणी भाषेचे नमुने घेऊन त्यांचें भाषिक पृथक्करण करूं. प्रथम खानदेशांतील अहिराणीभाषकांच्या अगदी मध्यवर्तीतील समाजाच्या बोलीचें स्वरूप पाहूं. पश्चिम खानदेश व पूर्व खानदेश ह्या दोन प्रांतांच्या अगदी मध्यावरील ठिकाणीं ही भाषा ज्या स्वरूपांत बोलली जाते, त्या स्वरूपांत मराठी व गुजराती ह्या दोन्ही भाषांच्या खुणा कोणकोणत्या व त्या किती प्रमाणांत आढळतात हें ठरविण्याकरिता खाली एक त्या प्रांतांतील बोलीचा नमुना घेऊन त्याचें पृथक्करण केलें आहे. उतारा पुढीलप्रमाणे आहे.

## अतिथिसत्कार

१०. राम राम पाहुना,

**मी तुमले कधयसना देखी राहेनूस. सग्या बाजार** चाफली मारा, **पण तुम**ना **पत्ता बी नही व्हता; बरा सापडनात. तुमले नीवत देवानसे.आपली जागेल विस्तरवारना रोज** आंबाना **रस** कराना से; **तर तुम्ही व म**नी **बहीण आणि तुमना** डिक्रा **सुपडू असे तुम्ही** सकायनी **पायरे** जलदी निघी **या. तुमना** साळू **भाऊले वी निवत** दियेलसे **पण या येत का नही काय जान ? तुम्ही** मातर **राहू** नका; **नहीतर सगे अन्न खराब** व्हओ **जाओ; पण** आते **तुमनी** हाते **घा**ओ **आंबे** लिओ **द्या. आंबासना भाव पढेलसे. तीन रुपयाना आंबा गंज झायात.**

११. ह्या वरील उतान्यांत एकंदर पंच्यांऐशी शब्द आहेत. त्यांत मराठी शिक्क्याचे शब्द साठ व गुजराती शिक्क्याचे पंचवीस शब्द आहेत. म्हणजे साधारणपणें मराठी शब्दांचें गुजराती शब्दांशीं प्रमाण १००:४१ असें पडतें. ह्या बोलींतील एकंदर शंभर शब्दांपैकी अस्सल मराठी शब्द ७० (सत्तर) व अस्सल गुजराती शब्द ३० (तीस) पडतात. ही झाली शब्द-समूहासंबंधाची बाब; म्हणजे केवळ शब्दांसंबंधी बोलावयाचें झालें तर ह्या भाषेस मराठीचाच प्रांतिक भेद समजणें प्रशस्य आहे. परंतु हीच बाब आम्ही इतकीशी प्रमाणभूत मानीत नाही. हेंच प्रमाण निर्णायक नाही. ह्याला व्याकरणाचा पाठिंबा मिळाला तर ह्याचें महत्त्व हें उघड

आहे. भाषांभाषांचें नातें ठरविण्यास केवळ शब्दसमूहाचेंच प्रमाण हें निश्चित स्वरूपाचें मानीत नाहीत. ह्या प्रमाणाला रूपप्रक्रियेचा कितपत पुरावा सापडतो हें पाहूं.

रूपप्रक्रियेंत पुष्कळ बाबी असल्या तरी नामविभक्ति व आख्यातविभक्ति त्या दोन प्रधान बाबी होत. नामविभक्तींतच सर्वनाम, विशेषणादि सव्यय शब्दांचा समावेश होतो. आख्यात-विभक्तींत धातूंच्या, काळांच्या व अर्थांच्या रूपांचा अंतर्भाव होतो. नामविभक्ति व आख्यात-विभक्ति ह्या दोन बाबींत मराठी व गुजराती ह्या दोन भाषांची टक्केवारी किती पडते हें पाहूं.

(१) एकंदर ८५ शब्दांपैकी अठ्ठावीस नामें,चौदा सर्वनामें,सत्तावीस क्रियापदें आणि सोळा अव्ययें आहेत. एकंदर ८५ शब्दांत ६९ सव्ययें आणि १६ अव्ययें आहेत. सव्ययांत नाम-विभक्त्यंकित बेचाळीस शब्द आहेत आणि आख्यातविभक्त्यंकित २७ शब्द आहेत. ह्या बेचाळिसांत अठ्ठावीस नामें व चौदा सर्वनामें आहेत असें वर सांगितलेंच आहे. नामविभ-क्तींत "राम, राम, पाहुना, मी, तुम्ही, पत्ता, डिका, सुपडू, साळू, अन्न, आते, भावढि, आंबा" हीं सर्व संबोधन किंवा प्रथमा विभक्तीचीं रूपें होत व ह्या रूपांच्या मराठीपणाबद्दल कोणालाहि शंका येणार नाही. मध्यमराठींतहि प्रथमेचीं रूपें अशींच होतात. ही झाली प्रथमा व संबो-धन ह्यांची गोष्ट. द्वितीया विभक्तीचीं रूपें प्रथमेसारखींच कांही वेळां होतात. त्या वेळीं ती अप्रत्यय द्वितीया होय. द्वितीयेचीं रूपें पुढीलप्रमाणे आहेत. तुमले, निवत, जागेल, भाऊले, आंबे, हीं द्वितीयेचीं रूपें होत. द्वितीयेचा प्रत्यय 'ले' हा मराठी 'ला' प्रत्ययाला जवळचा आहे. तृतीयान्त एकच नाम 'हातें' हें आहे. व तें मराठीसारखेंच आहे. गुजरातीमध्ये तेंच तृतीयेचें रूप होईल. चतुर्थी व द्वितीया ह्या दोन्ही विभक्ति सारख्याच आहेत. पंचमीचें एक रूप आहे. कधयसना व त्यांतील प्रत्यय'सना' हा मराठी सून (हूनचें दुसरें रूप, [< प्राकृत 'हिन्तो,' 'सुन्तो']) ह्या प्रत्ययालाच अधिक जवळ आहे. गुजराती पंचमीचा प्रत्यय जो 'थी' त्याच्याशीं ह्याचा कांही संबंध नाही हें उघड आहे. सप्तमीचीं रूपें "जागे पायरे" हीं दोन्ही रूपें मराठीच्या रूपांच्या जवळचीं आहेत. गुजराती सप्तमीचा प्रत्यय 'मां' ह्यांच्याशीं कांही संबंध नाही.

(२) नामविभक्तींपैकी राहिलेली विभक्ति जी षष्ठी तिचीं रूपें "तुमना, विस्तरवारनी, आंबाना, मनी, तुमना, तुमनी, आंबासना, रुपयाना" हीं होत. ह्या रूपांचे प्रत्यय ना, ने दिसतात. आणि हे प्रत्यय मात्र मराठी शिक्क्याचे नव्हत. हे गुजराती आहेत. सर्वनाम-विभक्तींत षष्ठी विभक्ति मात्र गुजराती भाषेंतील आहे हें उघड दिसतें. प्रत्यय 'न' (प्राकृत नो). मराठी षष्ठीचा प्रत्यय 'च' (प्राकृत 'त्य') आहे.

आता आख्यातविभक्तींचा विचार करूं. एकंदर आख्यातविभक्त्यंकित शब्द सत्तावीस. ते पुढीलप्रमाणे आहेत. "देखी राहेनूस, चाफली मारा, नही व्हता, सापडनात, देवा-नसे, करानासे, निघी या, दियेल से, येत नही जान, राहू नका, नही व्हई, जाई लिई, द्या, चढेल से, झायात." हीं सर्व आख्यातविभक्ति होत. ह्या रूपांतील जाड ठशांतील सर्व रूपें मराठी शिक्क्याचीं आहेत. राहेनूस = राह्यलो, नहि व्हता = नव्हता, सापडनात = सापडलात, या = या, येत नहि = येत नाही, जान = जाणें, राहू नका, नहि= नाही, जाई = जाई (ल), द्या = द्या, चढेल = चढेल, झायात = झालेत. अशीं त्यांचीं मराठी प्रतिरूपें होतात. व हीं रूपें त्यांना किती तरी जवळचीं आहेत. ह्यांचीं गुजराती आख्यातरूपें फारच भिन्न होतात.

ह्या सर्व रूपांत दोन लकबी मात्र गुजराती दिसतात हें उघड आहे. एक लकब

'ल्यबन्तासंबंधी'. देखी, निघी, व्हई, लिई, हीं ल्यबन्तें (पूर्वकालवाचक धातुसाधितें) हीं अस्सल गुजराती होत. हींच मराठी रूपें 'देखून, निघून होऊन, लेऊन' अशीं होतात. तेव्हा हा विशेष गुजराती आहे. परंतु ह्यांतहि मराठीच्या बाजूने एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. ह्या रूपांचे धातु अस्सल मराठी आहेत. देख, निघ, हो हे मराठी धातु आहेत. शिवाय ह्या रूपांशीं संयुक्त असलेलीं मुख्य क्रियापदरूपें हीं पुनः मराठीच आहेत. देखी, राहेनूस, निघीया, व्हई जाई, लिई, द्या ह्यांतील जाड ठशांतील मराठी रूपें आहेत. दोन आज्ञार्थी, एक भूतकाळ व एक भविष्यकाळ अशीं हीं रूपें आहेत. तेव्हा ह्या रूपांतील मराठी व गुजराती ह्या भाषांचा वांटा समसमान आहे.

(३) दुसरी लकब 'से' ह्या क्रियापदासंबंधी. हें रूप गुजराती (छे) आहे ह्यांत शंका नाही. "देवानसे, करानासे, दियेलसे, चढेलसे" ह्या रूपांत 'से' हें क्रियापद उतरलें आहे. तेव्हा त्या दृष्टीने हीं रूपें गुजराती ठरतात. परन्तु ह्याहि रूपांसंबंधी एक गोष्ट उल्लेखनीय आहे. आणि ती म्हणजे ही. हें 'से' क्रियापद कधी गुजराती आख्यातरूपांना चिकटलेलें दिसतें तर कधी मराठी आख्यातरूपांना चिकटलेलें दिसतें. हीं संयुक्त आख्यातें आहेत, व त्यांतहि दोन्ही भाषांचा वांटा समसमान आहे असें उघड प्रतीत होतें. 'देवानसे, करानसे' ह्यांतील देवान < देवानु (गुज.), करान < करनु (गुज.) हीं गुजराती व दियेलसे चढेलसे ह्यांतील दियेल < देईल (मराठी), चढेल < चढेल (मराठी) हीं रूपें मराठी होत. पुनः देवान, करान ह्या गुजराती रूपांतील 'दे, कर' हे धातु अस्सल मराठी शिक्क्याचे आहेत ही बाब निराळीच. तेव्हां ह्या रूपांबाबतहि कांटा मराठीच्या बाजूला पन्नासापेक्षा अधिक टक्के सत्तर टक्क्यांपर्यंत झुकतो आहे हें उघड आहे.

(४) ह्याच्यापुढे वाक्प्रचाराचा विचार ओघानेच येतो. "बरा सापडनात; येत कां नाही कायजान; तुम्ही मातर राहूं नका; आंबा गंज झायात; हे प्रयोग तर अस्सल मराठी आहेत. ह्यामध्ये इतर भाषांचा कांही गंधहि नाही."

अव्ययांपैकी पण, बरा, रोज, तर, बी, व, आणि, जलदी, कां, मातर, नाहीतर हीं सर्व अव्ययें अस्सल मराठी आहेत.

(५) ही येथपर्यंत प्रत्ययप्रक्रिया (Morphology) झाली. आता वर्णप्रक्रिया (Phonology) पाहूं. व तीवरून मराठी व गुजराती ह्यांची भागवारी काय दिसून येते हें पाहूं.

वर्णप्रक्रियेंतहि अस्सल मराठी वर्णोच्चार बरेच आढळून येतात. स्वरांचे ह्रस्वदीर्घोच्चार व निभृतोच्चार हे सर्व मराठीच आहेत. गुजराती संवृत व विवृत 'ओ' हा उच्चार कोठेहि आढळून येत नाही. व्यंजनोच्चारहि मराठीच आहेत. गुजराती श्वासोच्चार, हकारप्राचुर्य आढळत नाही. सुरती भाषेच्या लगतच्या ह्या भाषेच्या नमुन्यांत हकारप्राचुर्याचा अभाव उल्लेखनीय आहे. व्यंजनप्रक्रियेचा एक विशेष लक्ष्य आहे. तो 'ल्-ळ्' संबंधीचा. मूर्धन्य ळ, किंवा दन्त्य न् हे नरमावून त्यांचा 'ल्' असा उच्चार होतो. कांही ठिकाणीं ह्या 'ल्-ळ्' चा 'य्' झाला आहे (सग्या, सकाय झायात्). कांही ठिकाणीं तो तसाच राहिला आहे. (साळू) 'ल् ळ्' चें 'य्' होणें ही लकब मराठीमध्ये आढळून येते. विशेषतः कोंकणी मराठींत ही लकब पदोपदीं आढळते. नागपुरी किंवा वऱ्हाडी मराठींतहि क्वचित् ही लकब आढळते. तेव्हा हा प्रांतिक वर्णोच्चार मराठी आहे. हा एकच विशेष ह्या भाषेचें मराठीशीं जवळचें नातें ठरविण्यास पुरेसा आहे. घोषवर्ण (म्हद्द) नासिक्यलोप, (= नीवत < निमंत्रण) संयुक्त व्यंजन व्यस्त करणें (मातर) ह्या आणखी पुराव्याच्या बाबी आहेतच.

१२. ह्या सर्वांचा फलितार्थ थोडक्यांत पुढीलप्रमाणे आहे.

(१) मराठी गुजराती शब्दांचें प्रमाण १०० : ४१ असें आहे.

(२) नामविभक्तींपैकी प्रथमा, संबोधन, द्वितीया (सप्रत्यय व अप्रत्यय), चतुर्थी, तृतीया, पंचमी, सप्तमी ह्या मराठी दिसतात.

(३) षष्ठीं विभक्ति गुजराती दिसते.

(४) आख्यातविभक्तींत वर्तमान, भूत, भविष्य आज्ञार्थ, अकरणरूप हे सर्व मराठी दिसतात.

(५) ल्यबन्तरूप गुजराती आहे, परंतु त्यांचे धातु मराठी तद्भव दिसतात.

(६) अस्तिवाचक संधि क्रियापद (Copula)—से-हें गुजराती आहे; हें कधी मराठी आख्याताला तर कधी गुजराती आख्याताला चिकटलेलें दिसतें.

(७) वाक्प्रचार मराठी वळणाचे आहेत.

(८) वर्णप्रक्रियांत मराठीच उच्चार प्रामुख्याने आढळतात. गुजराती उच्चार कानावर ठसण्यासारखा असा आढळून येत नाही.

ह्यावरून निघणारें अनुमान अगदी स्पष्ट आहे. एकंदरींत वर विवेचिलेला नमुना व तत्संबद्ध अहिराणी भाषेचा एक पोटभेद, हा ऐंशी टक्के मराठी वळणाचा आहे. व त्या आधारावर ह्याचा मराठी भाषेंत समावेश करणें हें न्यायाला धरून आहे; समावेश न केला तर मराठीला अन्याय तर होईलच परंतु भाषाशास्त्राला सोडून होईल.

१३. आमचें हें वरील विधान सबळ करण्यासाठी खाली कांही लोकगीतें व एक संवाद देत आहों. त्यांचें वरीलप्रमाणे पृथक्करण करतां येण्यासारखें असलें तरी तें न करतां मराठी ठशाच्या लकबा जाड टाइपांत देतों; म्हणजे तेंच कार्य होईल.

जात्यावरील गीत

१ पांभेर वाई हायी । सुतारनी वय
कुनबी हिना भाऊ । हिले साज दिले वहू

(अर्थ : "पाभरीचा सासरा सुतार, कारण तो लांकूड तासून तासून तयार करतो. पाभरीचा भाऊ कुणबी, कारण तो पेरणीच्या वेळीं तिला सजवितो.)

[पृथक्करण : एकंदर बारा शब्दांपैकीं ९ मराठी व ३ गुजराती आहेत. षष्ठीरूपें—गुजराती द्वितीयाचतुर्थी—मराठी; क्रियापदें—मराठी.]

२ पाय पडणें उनी । हायीं कोनानी व्हती कोन
पिवया पितांवर । बधु शिरसाटनी सून

[पृथक्करण : एकंदर बारा शब्दांपैकीं दहा मराठी व दोन गुजराती आहेत. षष्ठी विभक्ति गुजराती व इतर सर्व रूपें मराठी आहेत.]

कवित उखाणा

३ हातमा मुंदी सोनानी । डोकामा पागोटी कोनानी
ठसक मोठी बोलांनी । आघळा नानानी देणानी
विपत पड गई दानानी

(अर्थ : कोनानी-कोपरा असलेली; देणानी-कर्ज; दानानी-दाणे.)

[पृथक्करण : एकंदर सोळा शब्दांपैकी नऊ मराठी व सात गुजराती दिसतात. षष्ठी व सप्तमी रूपें गुजराती व इतर मराठी आहेत. क्रियापदरूपें मराठी दिसतात. विशेषणें व त्यांचीं रूपें मराठी दिसतात.]

४ साखर भोकर कुणबीनी । ते बांधी भाकर
पुढें दुसर । मागें ओखर । तसाच पेरी राहेना हो
पेरी पारी उना घर । बायकोनी लाई कटकट ।
उपाशी पोरें झायात घर ।
तठोन उठना । वान्याना तठे गया
"का उना भू ? कुठे पाणी बिनी पडू दे"
बाजरी देशू जुनी
असा बापू ठाकूरना झुटका । ते कैकेसले लागना चुटका

[स्पष्टीकरण : मराठी शब्द जाड टाइपांत दाखविले आहेत त्यांवरून समजून येण्या-सारखें आहे.]

खाली अहिराणी भाषेतील संवाद दिले आहेत.

१ दामू— काहो काका, चालतसना धुयाले !
काका— दामू, मले फार काम शे नाहीं तर येतू धुयाले.
दामू— तुमन काम होई जाई मंग तर ईशातना ?
काका— अरे मना घर पाहुणा येणार शे.
दामू— तुमना घर कोठेना पाहुणा येतस ?
काका— वाळकीना बाबू येणार शे.
दामू— कांहीं सोयरीक नते काम नहीं ?
काका— अरे हो तो कोंडूले देखाले येणार शे.
दामू— मग आवंदा कोंडून लगीन करान शे का ?
काका— अरे तो आते सोया वर्षासना झाया. मग लगीन कराले नको ?
दामू— लगीन ते करालेच जोयजे (पाहिजे)
काका— उनात का वळकीनां बाबू पाटील ?
दामू— बाबू पाटील पोरगा चांगला हुशार शे. मुलगी देवाले तुम्ही कांहीं अनमान करूं नका.
बाबू— मुलगी देवानी शे.
काका— दामू, आते पाहुणाके चांगली शागोती आण.
दामू— बरे शे काकाजी मी लई येस, येतो शागोती.
दामूनें शागोती आणी.
काका— कस काय शे बाबू पाटील ? मुलगी देवान !
बाबू— दीनी आमनी मुलगी.
दामू— मग लगीनना बेत नक्की करा.
बाबू— चैतर व० दशमीना नेम नक्की करा.
काका— दामू, चाल आते धुयाले लगीनना सामानही लई येऊं.
दामू— वा ! चांगलं झाया काकाजी. एक काम मिना दोन्ही कामें होई जातीन.
त्या (ते) दोन्ही झन धुयाले गयात व सामान लई उनात मग कोंडून लगीन होयी गयी.

ह्यांतील मराठी शिक्क्याचे शब्द व रूपें जाड टाईपांत घातलीं आहेत, त्यावरून मराठी-गुजरातीची विभागणी स्पष्ट होण्यासारखी आहे.

२ प्रश्न— तूं कताअीन उना.
उत्तर— मी अथाईन उनू.
प्रश्न—मी तुले सांग व्हत तें काम तूं के कां.
उत्तर—गडया, माले याद नई रायना.
प्रश्न— बालाजीनी आन.
उत्तर— बालाजीनी आन भो.
प्र०—कालसीन नदीवर झेपाले चालझीरे.
उ०—गडया, मनी माय जाऊदी ते ईसू भो.
प्र०— तुनी सायमा कितला पेरे पास झायात.
उ०—मनी सायमा १८ पोरें पास व्हयनात भो.
प्र०— गडया तुना मास्तर कोन जातना से:
उ०— मना मास्तर कोयी से.
प्र०— त्यानं गांव कोतं से.
उ०— त्यानं गांव चेलन से.

## गौळण (पद)

तूं से तरि कोना दावुं नको शहानपना ।
मी नंदाना काना पेरे शेतस गौळिसना ॥
नको माले शिष्या देऊं । आम्ही समदा मिळी येऊं ।
दहि दूध चोरी खाऊ । आऊ माल नही मुफतना ।
रे काना दाऊं नको शहानपना ॥१॥
कां लेस मनं नांव । तूं नं आडमढ जाव ।
तुले मरी माय खाव । जाई सांगसू गन्हान ।
रे काना दाऊं नको शहानपना ॥२॥
मी से मोठानी नार । मना बाप सावकार । भाऊ करस कारभार ।
पाटील से. मथुरेना काना ॥३॥

१४. अहिराणी भाषेंतील कांही नमुन्यांचें पृथक्करण येथवर केलें. आता त्या भाषेचें भाषाशास्त्रीय पृथक्करण करतों. प्रथम तिची वर्णप्रक्रिया, नंतर प्रत्ययप्रक्रिया ह्या बाबींचा विचार करूं.

## (१) वर्णप्रक्रिया

१. 'ए' ह्या उच्चाराची अहिराणी लकब ही पुणेरी मराठीसारखी आहे. गुजरातीसारखी नाही. मराठीमध्ये 'ए' चा उच्चार नेहेमीच्या बोलण्यांत 'अ' असा ह्रस्व होतो. "बोलणें, वाटणें, करणें, जावें, केलें, पुणें" इत्यादि अकारान्त शब्द बोलतांना "बोलणं, वाटणं, करणं, जाव, केलं, पुण अशा रीतीने 'अ'कारान्त उच्चारिले जातात. हा 'ए' उच्चार मराठीमध्ये संवृत रीतीने उच्चारिला जातो तर गुजरातीमध्ये विवृत रीतीने उच्चारिला जातो. कांही कांही ठिकाणीं सातारी मराठीप्रमाणे 'ऐ, ओ' बद्दल 'यो' उच्चारिला जातो. 'तो, हा' ह्यांबद्दल 'त्यो, ह्यो', 'ते' बद्दल 'त्या' असे उच्चार होतात.

२. व्यंजनोच्चारांपैकी अहिराणी भाषेंतील बरेच व्यंजनोच्चार मराठी उच्चारांसारखे आहेत. तालव्य अुच्चार दन्त्यतालव्याप्रमाणे उच्चारण्याची प्रवृत्ति मात्र सररहा आढळून येत नाही. कांही विशिष्ट भागांतच आढळते. परंतु ती प्रवृत्ति अहिराणी भाषेंत आहे ही महत्त्वाची बाब आहे; आणि ही प्रवृत्ति अस्सल मराठी आहे. दुसरी 'ळ्' चें 'य्' होणें, 'ण्'चा उच्चार 'न' किंवा 'ल्' मध्ये नरमावणें ही आणखी एक महत्त्वाची बाब आहे. अमळनेरच्या भाषेंत ही प्रवृत्ति विशेष आहे. ह्या प्रवृत्ति मराठीच्या इतर बोलींत कोंकणीमराठी व ग्रामीणमराठी व वऱ्हाडी ह्या बोलींत आढळून आल्यामुळे तर ही विशेष पुराव्याची बाब आहे. 'व्' ह्या व्यंजनाचा उच्चार अर्धस्वरासारखा होत नसून, कांही विशिष्ट परिस्थितींत स्वरासारखा होतो. विचार, विकत, विडा, वीष इत्यादि शब्द 'इचार, इकत, इडा, इष' असे उच्चारिल जातात. हीहि प्रवृत्ति ग्रामीणमराठी, वऱ्हाडीमराठी ह्या बोलींत दिसून येते. आणखी एक महत्त्वाचा अहिराणी उच्चारविशेष फार महत्त्वाचा आहे व तो अहिराणीचें मराठीशीं नातें दृढ करतो. तो म्हणजे श्वासयुक्त व्यंजनें व अनुनासिकांबद्दलचा. श्वासयुक्त व्यंजनांचा उच्चार गुजरातीमध्ये श्वासयुक्तच उच्चारतात. 'श्वास' अधिक प्रामुख्यानें गुजराती उच्चारांत दिसून येतो. तोच तिचा विशेष आहे. परंतु मराठीमध्ये ते उच्चार श्वासरहित उच्चारतात. ख्, घ्, छ्, झ्, थ्, ध्, फ्, भ् इत्यादि उच्चार क्, ग्, च्, ज्, त्, द्, प्, ब् असे उच्चारतात. दुसरी गोष्ट अनुनासिकांची. गुजरातीमध्ये अनुनासिकें नासिक्यच उच्चारतात, तर मराठीमध्ये निर्नासिक्य उच्चारतात. नासिक्य उच्चाराचा साधा उच्चार कोंकणशिवाय सर्व प्रान्तांत केला जातो. ह्यामुळेच मराठीमध्ये अनुच्चारित अनुस्वाराचा प्रकार आला आहे. हा प्रकारहि अहिराणीस मध्यमराठीच्या जवळ आणतो.

३. अहिराणींत मराठी गुजरातीप्रमाणे तीन लिंगें, दोन वचनें आहेत. वचनांचा मात्र घोटाळा होतो. आदरार्थी बहुवचन कोंकणी मराठीप्रमाणे होतें. 'त्यासले, घोडासना' अशीं होतात. नामाचीं अनेक वचनें मराठीप्रमाणें होतात. अंडोर, गाया, पोरी, घोड्या, डुकरें, इत्यादि अनेकवचनाचीं रूपें मध्यमराठीप्रमाणे आहेत. 'घोडा' हें अनेकवचन मात्र गुजराती वळणावर आहे. परंतु तें एकच आहे. अहिराणीमध्ये एकवचनाच्या प्रत्ययापूर्वी शब्दाचें सामान्यरूप होत नाही. अनेकवचनाच्या प्रत्ययांपूर्वी सामान्यरूप कांही कांही ठिकाणीं होतें. अनेकवचनाचे प्रत्यय लागतांना सामान्यरूप स्वतंत्र 'स' हा प्रत्यय लागून होतें. बापेसले, पोरीसले, घोडासना, मानसेसले, मानुसले अशीं रूपें होतात. विशेषणास लिंगवचनाचे फरक मराठींतीलप्रमाणेच होतात. पुरुषवाचक सर्वनामाचीं रूपें, दर्शक सर्वनामाचीं रूपें, कोण हें प्रश्नार्थक सर्वनाम इत्यादि बाबी मध्यमराठीच्या वळणावरच आहेत.

## (२) प्रत्ययप्रक्रिया- (१) नामविभक्ति

(१) खालीं नामसर्वनामाच्या निरनिराळ्या विभक्तींचीं रूपें दिलीं आहेत. नंदुरबार, सिंदखेड, निमार अशा तीन टोकांच्या तीन भाषांतील हीं रूपें असल्यामुळे त्यांवरून भाषेच्या स्वरूपाची पूर्ण कल्पना येईल.

प्रथमा (नन्दुरबारी):— आंडोर, हें, तें, जी, कोणी, मी, तु, हौ.

सिंदखेडी:— साडया, साळू, मी, रुपये, खबर, पहारा, खनना.

निमारी:— ते, तो, तमासा, दाडा, छोकरा, शाबासकी, वाड, माय, दुसासा.

द्वितीया नंदु.— माणुसले, बापले, हिस्साले, माणसले, माले, त्याले, त्यासले, आपले, चाकरले.

सिंद.— आपलाका, त्यासन, मसन.

निमारी.— शिपाइले, छाकराले.

तृतीया नंदु.— माणुसने, तूपान, त्यान, ज्याने, माणुसन, त्यामुये, त्यानी, बकरीन.

सिंद.— सिंदखेड्याने.

निमारी.— त्याएं, तिएं.

पंचमी नंदु.— दिनथी, मनापान, मनापास.

षष्ठी नंदु.— मना, मनी, त्याना, तुना, देवना, त्याना, याना.

सिंद.— पाटीलना, रुपयाना, गावना, आमन, आमने.

निमारी.— त्यानी, माणी, छोकरानी, सरकारना, लोकोना, पोतानी.

सप्तमी नंदु.— त्यामाना, खेतमां, घर.

सिंद.— त्यामा, गाडीमा.

निमारी.— चोरीमां, कोई दाडे.

(२) अहिराणी भाषेंत नामविभक्तीचे प्रत्यय खालीलप्रमाणे आहेत. हे प्रत्यय लावण्यांत नामाचे अन्त्य वर्ण किंवा त्यांचा लिंगभेद फारसा विचारांत घेतला जात नाही. सर्वांना हेच प्रत्यय सामान्य तऱ्हेने लागतात. विशेष लक्ष्य असें सामान्यरूप होतांना दिसत नाही.

नामप्रत्यय

| | ए. वचन | अ. वचन |
|---|---|---|
| प्रथमा | — | — |
| द्वितीया | ले | ले, सले, हले |
| तृतीया | नी, न्ही, कडतीन, कड, नाकन, वरी | नी, सनी |
| चतुर्थी | ले, से | ले, सले |
| पंचमी | थीन्, तिन, पान् | थीन्, सतिन, सथिन, सपान |
| षष्ठी | ना, नी, न, न्ह, न्हीं | ना, नी, न, सना, सनी, सन, सन्ह, सन्ही |
| सप्तमी | मा, म, मझार | मा, समा, सम, सयझार |

हे प्रत्यय लावून अहिराणी भाषेंत नेहमी वापरला जाणारा 'भाऊ' हा शब्द खाली चालवून दाखवितों.

| | अेकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ | भाऊ (भॉव) | भाऊ (भॉव) |
| २ | भाऊले | भाऊले भाऊसले |
| ३ | भाऊनी | भाऊनी, भाऊसनी |
| ४ | भाऊले | भाऊले, भाऊसले |
| ५ | भाऊथीन | भाऊथीन |
| ६ | भाऊनी, °नी, न | भाऊना, °नी, °न, भाऊसना, भाऊसनी, भाऊसन |
| ७ | भाऊमा | भाऊमा, भाऊसमां |

१ प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी ह्या विभक्तीचे प्रत्यय मराठी प्रत्ययांप्रमाणे आहेत. मध्यमराठी द्वितीयेचा 'ला' प्रत्यय वऱ्हाडींतील चतुर्थीचा प्रत्यय 'ले' आहे.

२ तृतीयेचे कर्तृर्थी प्रत्यय मराठी प्रत्ययांप्रमाणे आहेत.
३ षष्ठी व सप्तमी हे गुजराती प्रत्यायांसारखे आहेत.

## प्रत्ययप्रक्रिया-(२) आख्यातविभक्ति

१ वर्तमानकाळ— करस, करतस, (सर्वपुरुषी. ए. व. अ. व.)

२ चालू वर्तमानकाळ— गुफी रायना, करी रायना,. जाय रायना (करून राहिलों)

२ भूतकाळ-नंदुर.—ग्या, निघना, के (एकच रूप तिन्ही पुरुषी, दोन्ही वचनी) जाया, लिधा, राहिना, घाड, वाटन, बोलना, उना, म्हनना, मिळना, पडना,-हायना लागला, करना, पळना, अतलाना, दिना.

सिंदखेड— आताल, टोचना, लागा, मारता, पळला, आतलाना, व्हते.

४ चालू भूत.— होत, गेत होता, चाली न्हायन, करी लागना, करू लागनात, त्यानी करेलसे तो करत.

निमाडी— जाताता.

५ पूर्णभूत— ग्याथा.

६ कर्मणि— दिध, इचार लिधा, मोडा.

७ प्रयोजक— उडाअी.

८ अकरणरूप— नको, जायना, मोडा नही, नही, दिनातनी.

९ भविष्यकाळ— जास, येईल, करसु, करसूत, करसी, करशात, करशाल, करी, करतीन, करतील.
(तो) करनारसे.

१० ल्यबन्त—१ खर्ची, घाली, एकू मरी, हुई, वाटी, निघी, म्हनी, पुरनी, बडाई (सिंदखेड.)
२ म्हणून, म्हनून, करून, ज्याईसन जाईसन, उठीसन, देखीसन, येईसन, फिरीसन, बोलाविसन, ऐकीसन, उठीनी, पडिसनी, लेईनी, खाईपिईसनी, लयिनी, मिळसनी, होईसनी.

११ आज्ञार्थ— टाक, सांगसु, होसु, ठेव, सांग, घाल, देख, घाला, दे, कर.

१२ विध्यर्थ— (पोट) भरव, (धुक्या) मरस, जास (म्हनस), (मजा) करवी.

१३ संकेतार्थ— आवरीसन आळखतु,

१४ तुमन्त— खावाले, जीवत, चाराले, करवो, लेवाले, खावापिवा, येता (बरोबर). ह्यावरून पुढील प्रमेयें निघतात.

अहिराणी भाषेंत क्रियापदांची रूपसिद्धि ही एका विशिष्ट पद्धतीने होते. एकवचन व अनेकवचन ह्यांचा परस्परविपर्यय होतो. 'जायात' हें रूप दोन्ही वचनीं वापरतात. अहिराणी भाषेंत कर्तरि, कर्मणि व भावे असे तीन प्रयोग आहेत. भावेप्रयोगांत कर्ता पुलिंगी असेल तर क्रियापद पुलिंगी होते. कर्मणि प्रयोगांतहि हा प्रकार आढळतो.

त्याए तिले बलावी—- त्याने तिला बोलाविलें.

तो करना — त्याने केलें (शब्दशः—तो केला.)

हा प्रकार बहुतेक कानडी किंवा तेलगूसारख्या द्राविडी भाषेच्या संपर्कामुळे आला आहे. हा द्राविडी भाषेचा संपर्क अहिराणी भाषेचें मराठीशीं नातें अधिक जवळचें करतो.

वर्तमानकाळाच्या प्रत्ययांत एक 'स' हा आगम येतो. एक तर हा 'स्य' पासून आला असावा किंवा गुजराती 'छे=सें' चा अवशेष असावा. परंतु याबद्दल ठाम मत देतां येत नाही. आमच्या मतें तो 'स्य' ह्या संस्कृत भविष्यकाळाच्या चिन्हाचा अवशेष असावा; कारण तो सर्व पुरुषांत वापरतात. शिवाय अनेकवचनांत हा 'स' दोनदा वापरतात.

भूतकाळाचीं रूपें अस्सल मराठी आहेत—व्हता, व्हतु, व्हतुत, व्हतात, व्हत हीं रूपें सातान्याकडील ग्रामिण भाषेंतहि वापरतात.

तेव्हा ह्यांचा गुजराती रूपांशीं कांही संबंध नाही. फेक, टांक वगैरे भूतकाळाचीं रूपें तिन्ही पुरुषीं व दोन्ही वचनीं एकच चालतात. भूतकाळाचीं कांही रूपें "मी बोलनु, आम्ही बालनुत, तू बोलना, तुम्हू बोल्नात, तो बोल्ना त्या बोल्नात" अशीं होतात. ह्या रूपांतील 'न' आगम हा महत्त्वाचा आहे. तो द्राविडी असल्याबद्दल डॉ. ग्रियर्सन यांचें म्हणणें आहे. आमच्या मतें तो निश्चित आर्य शिक्क्याचा आहे. जुन्या मराठीतील "दिन्ना, दिन्हला" वगैरे रूपांमधील 'न्ह, न्न' ह्याचा अवशेष आहे. 'दान देन्ल' > दानन् दिन्नम् > दानम् दत्तम् अशा मार्गाने त्याची व्युत्पत्ति शास्त्रसिद्ध आहे. करसु, करसूत, करशी, करशाल, करी, करतील हीं 'कर' धातूचीं भविष्यकाळचीं रूपें आहेत.

(१५) ह्यावरून सूक्ष्म विचारान्तीं पुढील सिद्धान्त निष्पन्न होतात.

१ अहिराणीची आख्यातविभक्ति मराठीच्या वळणावर आहे.

२ वर्तमानकाळ, भूतकाळ, भविष्यकाळ, आज्ञार्थ, चालूवर्तमान ह्या काळांतील रूपसिद्धि मराठीप्रमाणे आहे.

३ ल्यबन्ताची रूपसिद्धि गुजरातीप्रमाणे आहे.

## शब्दसमूह

(१६) आता शब्दसमूहाचा विचार करूं. शब्दसमूहांत सुद्धां वाटेल ते शब्द न घेतां जे नेहमीच्या प्रचारांत येतात असेच शब्द घेऊं.

भाषेंतील एकंदर शब्दसमूहापैकी विशेष लक्ष्य असे कांही शब्द असतात. त्यांच्यावरून भाषांभाषांतील परस्परसंबंध ओळखला जातो. ह्या शब्दांत खालील प्रकार येतात.

१ नात्याचे शब्द, २ शरीरावयव, ३ खाद्यवस्तु, ४ पुरुषवाचक सर्वनामें, ५ कांही संख्यावाचक विशेषणें, ६ कांहीं नेहमींचीं अव्ययें (विशेषतः पादपूरणार्थक), ७ कांही विशेष रूढ असे शब्द.

आता हे सर्व प्रकार मांडून त्यांचा मध्यमराठींतील त्या त्या प्रकारांतील शब्दांशीं कितपत साम्य जुळतें हें पाहूं.

| | अहिराणी | मध्यमराठी शब्द |
|---|---|---|
| (१) नात्याचे शब्द | जिजी | जिजी (आजी ह्या अर्थी) मावशी |
| | फुई | आत्या, आत्ये |
| | डिक्रा (मुलगा) | पुतण्या |
| | पुत डिक्री (मुलगी) | पुतणी |
| | जेठाणी | भावजय (थोरली) |
| | देराणी | भावजय (लहान) |

| | | |
|---|---|---|
| | आंडोर | मुलगा |
| | आंडेर | मुलगी |
| | बाप, भाऊ, आय | |
| (२) शरीरावयववाचक शब्द | जीव | जीभ |
| | डोया | डोळा |
| | गया | गळा |
| | अंगोळी | अंगोयी |
| | हात, पाय, डोओ, पोट हे सारखेच आहेत. | |
| (३) खाद्यवाचक शब्द | शाक | भाजी |
| | डाय | डाळ, वरण |
| | घी | तूप |
| | बेसन | पिठलें, बेसन |
| | रोटी | पोळी, रोटी |
| | हळ्यद | हळद |
| (४) फळें | जांव | पेरू, जांब |
| | साकु | रताळीं |
| | बेंगन | बेंगन, वांगीं |
| | गूय | गूळ |
| | चीच | चिंच |
| | निंबू | लिंबू |
| | कोथमेर | कोथिंबिर, कोतमीर |
| | लोन्सान | लोणचें |
| | कईठ | कवठ |
| (५) पुरुषवाचक सर्वनामें | मी आमी आम्ही | तू तुमी तुम्ही |
| | मले तूले | आमले तुमले |
| | मना | तूना |
| | तो ती ते | तो ती ते |
| | कोण, काय | इत्यादि |

(६) संख्यावाचक विशेषणें एक, दो, बे, तीन, चार, पाच, आडीच (सिंद.) तीन चार (सिंद,) अठरा, वीस, ईस, संभर, सौ (सिंद.)

(७) कांही अव्ययें के, कां, आन, आनि, अन्, वर, भो, तरी, न, व, आणि, मंग, समद, आखाडी, तघय, तधळ, मंगे, सुंदी, जुत.

सिंदखेडी आन, इतना, मंग, तेव्हा, त्यां कव्हालु हमेस, म्हनी, आनं, काही.

नेमारी ने, त्या उपरांत, पछी, जसाजसा, मोठे, तठे, तों, कें, वरी.

कांहीं रूढ शब्द यात्रा–जतरा, खतरा, बाहुली–भावली, बिवली, भांडी–बासन, गोधडी–गोधडी, कुरखळी–कुरखई, बाजार–बजार, गोसावी–गोसाई, विजार–इजार, जोडे–जुत्ता, चंद्रसूर्य–चांदसुऱ्या, घड्याळ–घडयाय, सकाळ–सकाय, दीस मावळ–दीन मावयना, तिखट–

तिखट, लसूण--लोसन, खळें--खय, रानांत--खेतमां, कोळपें--कायपे, चांदण्या--चांदन्या, उकीरडा- उखल्ला, शेणमाती--सेनपुंडया, विळी--पावशी, झरोका--सान.

१७. मराठी व अहिराणी भाषांचें साम्य आणखी प्रतीत होण्यासाठी त्या भाषेंतील कांही वाक्प्रचार येथे देतों.

१ वारा झानी माय नी खाटले जीव जाय.
२ डोकाले खौडा अन गुलालनी हौस.
३ घरमा नई दाना आनी दारसे नगारखाना.
४ गांव वये आनी हनुमान बोंबी चोये.
५ जोइ जोइ क्या याही, जातना निंघना भोइ.

## अहिराणी भाषेच्या स्वभावाची मीमांसा

१८. अहिराणी भाषेंतील नामविभक्ति, आख्यातविभक्ति, प्रयोगांचे अन्वय व अभिधान-शब्दचिकित्सा इत्यादि गोष्टी सांगून त्यांमध्ये मराठी--गुजरातीचा अंशभाग किती व कोण-कोणता आहे ह्याची येथवर चर्चा केली. ह्या भाषेच्या स्वभावाबद्दल असा संभ्रम कां उत्पन्न होतो ह्याचाहि उलगडा मागे एका रकान्यांत दिलेल्या सामाजिक रचनेच्या आधारें किंचित्सा केला आहे. अपभ्रंश भाषा बोलणारा समाज फार मोठा होता. अपभ्रंश भाषेचे प्रकार पुष्कळ होते. अहिराणी भाषा काय किंवा मराठी भाषा काय, ह्या दोन्ही भाषांत अपभ्रंश व महाराष्ट्री ह्या दोन्ही भाषांचे स्वभावविशेष उतरले आहेत. नामविभक्तींचे प्रत्यय हे अपभ्रंशापासून तर आख्यातविभक्तींचे प्रत्यय महाराष्ट्र भाषेपासून असें ऋण घेतलें आहे. त्यांत गुजराती भाषा ही प्राधान्येंकरून अपभ्रंशोत्पन्न (शौरसेनी अपभ्रंश किंवा नागर अपभ्रंश) असल्यामुळे षष्ठी, सप्तमी ह्या विभक्तींच्या प्रत्ययांत अहिराणी व गुजराती ह्या दोन भाषांत साम्य राहिलें आहे.

अहिराणी भाषेची आम्ही अधिक अधिक सूक्ष्म विचिकित्सा जसजशी करूं लागलों तसतशी अहिराणी आणि भिल्ली भाषा ह्यांचा निकटचा संबंधहि आम्हांस अधिक प्रतीत होऊं लागला. भाषाशास्त्रीयदृष्ट्या हाहि एक मोठा मनोरंजक विषय आहे. ह्या मार्गाने पुढे गेल्यास भाषिक माहितीबरोबर कांही सामाजिक व वांशिक माहितीहि प्रकाशांत येईल. आम्हांला एकवार तर असें वाटतें की भिल्ली भाषांचीं बरींच चिन्हें ह्या अहिराणी, निमाडी, रांगडी, गावती भाषांत आढळतात व अहिराणी भाषा ही सुधारलेली, सुसंस्कृत केलेली, मराठीपणाच्या अलंकारांनी सजविलेली अशी एखादी भिल्ली भाषा नसेल ना अशी शंका येते. अशी शंका येण्याइतका पुरावा पुढे येतो. परंतु ही बाब आमच्याकडे सोंपविलेल्या अधिकारक्षेत्राच्या बाहेर जात असल्यामुळे आम्हीं तिचा अधिक सूक्ष्म विचार केला नाही.

ह्या वरील सर्व विवेचनावरून फलादेश जो सिद्ध होतो, तो निर्णयाच्या रूपाने आम्ही खाली देत आहों.

१९. ज्या अर्थी वर्णप्रक्रिया, प्रयोगप्रक्रिया व शब्दसमूह ह्या भाषेच्या प्रधान अंगांच्या बाबतींत अहिराणी भाषा मध्यमराठीशीं अधिक निकटवर्ती असल्याचें दिसून येते व ज्या अर्थी अहिराणीभाषक हे मराठा समाजाशीं धर्म, इतिहास, आचारविचार, मतेंसमजुती इत्यादि संस्कृतीच्या प्रधान अंगांच्या बाबतींत अधिक एकरूप असल्याचें दिसून येतें त्या अर्थी अहि-


अनुक्रमणिका

राणी भाषा ही मराठी भाषेचा प्रांतिक भेद म्हणून समजली जावी आणि अहिराणीभाषक समाज हा मराठा समाजांत सामावला जावा आणि अहिराणीभाषकांनी शिरोगणति मराठा समाजाच्या शिरोगणतींत अंतर्भूत करावी.

परिशिष्ट

## अहिराणी भाषेंतील एक गोष्ट

(पां. मा. चांदोरकर)

१. उत्तर हिंदुस्थानमा अयोध्यानावन यक सहेर शे. तठे येक राजा होइग्या, त्यान्ह नाव दसरथ व्हत. तो धल्डा होइ ग्या. पन त्याले पोरसोर झाय नी. तव्हय त्यानी काय के, की त्यान्हा जो बाह्मन गुरु व्हता त्याले बलाइसन आन अन डिकरानी कांही तजवीज आमले दखाडा अशा त्याना रावन्या किध्यात. बामननी येक उपाय दखाडा. रुषि-सरिंग नावना येग रुषी व्हता. त्याले गावमाशार लइ येवान तयरन. तो शुना अन त्यानी बराबर मुक्रा रुषीं बी पन उनात. मंगन सऊ मिईसन सरयु नदीपान यदन क्या. तव्हय काय गंमत झाइ की हरीले करन; कुंडमाधीन काया काया रंगना अगीन देव निघना, निघिसना त्यानी दसरथ राजाले परसाद दिधा. राजानी त्याना तिन्ही बायकासले बलाई धाड; त्या उन्यात, मंग परत्येकले परसादना वाला वाला वाटा पाडिसन दिधा, त्यासनी तो परसाद खादा मंग भाऊले सांगु. तिन्हीसले बी दिन राह्यल्यात. दिन भरी जावावर त्यासले चरा दिकरा झायात. त्या पोरानी नांव राम, लक्षुमन, भरत आन सरतुघन असा ठवात.

### अहिरी ( कच्छमधील )

२. एक माणहने बे डीकरा हुंता, ते माँयथो ननकरे
डीकरे बापहें भण्यो 'बापा मारा भागनी जे
मिलकत थाय अी मुँहें भाँदू डीओ. ऐणें
पोतानी मिलकत अँहें वेंचूं डिनी. थोराक
डीँ वँहे ननकरो च्छोकरो वधोय भेलो
करूने च्छोँटू नूं मुलुक जातो स्यो.

### (४) भिल्ली, भिलोडी ( तळोदें- खानदेश )

३. मोती— रामराम पॉटील, रामराम, आव वोह तारो काय नांव !

मुंगा— रामराम, ओलखण विहिरी गोयलो केँ केँहे ! मी जुनानें मुंगा पोटील. आपु दहगाँव मिला अता.

मोती— हा एवी ओलखन जुडली. तु हाजो छे के !

मुंगा— हाजलो कायतन. छों छुरा अन पांच छुरीओ तिनागाडोख दूई छुरा रायलो,

मोती— दिहिरा का गयोलो,

मुंगा--एक हापे खादलो, दिहिरो नंदीपार ओंगळलो, गोयलो छू बुडीन मोरगोयलो. तिहरो विग्रामाय मोरगोयलो. तेरेपोछाल ओतो छू वीज पोडीन फाटीन मोरगोयलो च्छूरी-मादोक एक छूरी तेरे लाढे मार नाखली. दिहिरी वागे खादली.

## मावची खानदेशी ( पिंपळनेर, बागलण, नवापूर )

४. योका माहुला बेन पोहे हते. त्यामायवे वाहानो पोहो आत्रेहोला आखे, आवा मा वाटो जी जिनगी अँहे ँ ती माल दीजे. पाच्छे त्याएँ आपे जिनगी त्याहाँ वाटी दीनेल. पाच्छे दीघा दिहीँ नाय जाया जाया ताँव वाहानो आपेँ जिनगी एकठाईँ कोईँ दिधा दूड मुलुखामाँ निंघा गोयो. पाच्छे ताँ त्याएँ मौजमाँ रोहीँ होग्गा पैसा उडावी देना.

## बागलाणी, नाशीक

५. अरे तू कोण शास !
मी भिलडा शेअूस.
तुना नांव काय !
तान्या शे.
तूं कोठे जासरे !
मुल्हेर जास.
मुल्हेर दूर शे रातनारात अथे रहाय.
माले जरूरना काम शे अन मनी खावापिवानी काय तजवीज !
मी तजवीज लाअी देसू.
आरे तू कोण सास !
मी अठीना वतनदार जागल्या शेअूस.
बर शे माले घर लई चाल.

२

## कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा नव्हे

२०. आतापर्यंत अहिराणी भाषेसंबंधी विचार केला. वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, वाक्य-मीमांसा, शब्दविचार, वाक्प्रचार इत्यादि बाबी विचारांत घेऊन आम्हीं आपले निर्णय दिले. ह्यानंतर कोंकणी भाषेचा विचार करूं. अहिराणी भाषा ही गुजराती भाषेची पोटभाषा आहे, असें समजून मराठी भाषेपासून ती अलग केली गेली तर कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा आहे असें समजून ती मराठीपासून अलग केली. अहिराणी भाषेच्या प्रश्नाइतका कोंकणी भाषेचा प्रश्न बिकट नाही. कोंकणी भाषेचा मराठीशीं कांही संबंध नाही असें कोणी म्हणत नाही, व तिला स्वतंत्र भाषा म्हणून समजण्यांत हें तत्त्व मुळाशी नाही. दोन्ही भाषांचा परस्परसंबंध हा सर्वांना मान्य आहे. व ह्याच दृष्टीने कोंकणीचा प्रश्न सोपा आहे असें आम्ही म्हणतों. अमुक एक भाषा स्वतंत्र आहे, ती दुसऱ्या कोणत्याहि भाषेची पोटभाषा नाही असें मत प्रतिपादण्याच्या मुळाशीं निरनिराळीं कारणें असतात. तशा तऱ्हेचीं कांही कारणें ह्या मतप्रसाराच्या मुळाशीं

आहेत किंवा खानेसुमारी केली तेव्हा तीं होतीं की काय ह्या प्रश्नाचा विचार अवश्य असला तरी तो करण्याची आमची इच्छा नाही. कारण तो करण्यांत दुसऱ्यावर हेतुप्रेरकतेचा आरोप करण्याचा प्रसंग येण्याचा संभव आहे. आम्ही ह्या प्रश्नाकडे केवळ शास्त्राच्या दृष्टीने पाहणार आहों.

२१. एखादी भाषा स्वतंत्र केव्हा म्हणावी किंवा तिला स्वतंत्र भाषा केव्हा समजावी ह्याविषयी कांही गमकें आहेत. राजभाषा, धर्मभाषा, व्यवहारभाषा, आंतरराष्ट्रीयभाषा, ग्रंथभाषा, बहुजनभाषा, लेखनिविष्ट भाषा, आद्यभाषा, उच्चवाङ्मयसृजनशक्ति, अन्यभाषासृजनशक्ति, संस्कृतिप्रधानभाषा इत्यादींपैकी एक जरी गुण एखाद्या भाषेंत असला तरी त्या भाषेला स्वतंत्र भाषा म्हणून समजण्यास हरकत नाही. जगांतील निरनिराळ्या भाषांपैकी ज्या ज्या भाषा स्वतंत्र भाषा म्हणून गणल्या गेल्या आहेत त्या सर्वांच्या मुळाशी वर सांगितलेल्या गमकांपैकीं एक किंवा अधिक गमकें असल्याचें आपणांस दिसेल. पूर्वीच्या काळीं सुद्धा ज्या भाषा स्वतंत्र म्हणून समजल्या गेल्या त्यांच्याबाबतसुद्धां हीं वरील गमकेंच निर्णायक ठरलीं. आर्यभाषा ही स्वतंत्र कारण ती आद्य भाषा. वैदिक भाषा स्वतंत्र कारण ती सुसंस्कृत समाजघटकाची भाषा. प्राकृतभाषा स्वतंत्र कारण त्या बहुजनभाषा. पालीभाषा स्वतंत्र कारण ती धर्मभाषा व राजभाषा. अर्धमागधी स्वतंत्र कारण ती धर्मभाषा. अपभ्रंशभाषा स्वतंत्र कारण ती एका विभ्रमुसमाजगणाची भाषा. मराठी भाषा स्वतंत्र कारण ती महाराष्ट्रांतील आद्यभाषा. इङ्ग्रजी व फ्रेंच भाषा ह्या स्वतंत्र कारण त्या आंतरराष्ट्रीय भाषा, अशीं निरनिराळीं कारणें प्रत्येक भाषेस स्वतंत्र ठरविण्यास त्या त्या काळीं कारणीभूत झालीं. ह्या कारणांशिवाय आणखी इतर कारणांचा त्यांत हातभार होताच. स्वतंत्र गणल्या गेलेल्या भाषांपैकी कोणांत अन्यभाषासृजनशक्ति तर कोणांत उच्चवाङ्मय-सृजनशक्ति, कोणी लेखनिविष्ट तर कोणी संस्कृतिप्रधान असे आणखी गुण असल्याचें आढळून येतें. तेव्हा ह्या गुणाच्या दृष्टीने जर कोंकणी भाषा आपण पारखूं लागलों, तर कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा आहे असें प्रतिपादणें हें शास्त्रीय विचारसरणीला तितकेंसें धरून होणार नाही. कोंकणी ही राजभाषा नव्हे किंवा धर्मभाषा नव्हे. कोंकणी ही आद्यभाषा नव्हे किंवा बहुजनभाषा नव्हे. कोंकणी ही व्यवहारभाषा नव्हे किंवा आंतरराष्ट्रीय भाषा नव्हे. कोंकणी ही प्राधान्येंकरून ग्रंथभाषा नाही किंवा ती सुतरां लेखनिविष्ट भाषा नाही. कोंकणी भाषेंत कांही खिस्ती वाङ्मय पूर्वी, कांही प्रादेशिक वाङ्मय सध्या, निष्पन्न झालें असलें तरी तिच्यांत उच्च वाङ्मयसृजनशक्ति उत्पन्न झालेली नाही. कांही बालिश भाषा कोंकणीच्या पोटभाषा म्हणून जरी गणल्या जात असल्या तरी शास्त्रतः बोलावयाचें म्हणजे तिच्यांत अन्यभाषासृजनशक्ति अद्याप निर्माण झाली नाही. तेव्हा अशा सर्व दृष्टीने विचार करतां कोंकणी भाषेस स्वतंत्र भाषा म्हणून मानिली तर त्या सिद्धान्तास शास्त्राचा पाठिंबा मिळणार कसा ! व असा निराधार सिद्धान्त कोणीं प्रतिपादिला तर प्रांतिक किंवा प्रादेशिक अभिनिवेशाचा निदर्शक नाही का समजला जाणार !

कोंकणी ही स्वतंत्र भाषा नव्हे. ती मध्यमराठीची एक बहीण—ज्येष्ठ बहीण—आहे. कोंकणी भाषेचा आणि मराठी भाषेचा अगदी अजीबाद संबंध नाही; ती दुसऱ्याच कोणत्या तरी निराळ्या भाषेपासून उद्भवली असें कोणी मानीत नाही. ती एक स्वतंत्र भाषा आहे असें प्रतिपादणारे विद्वानहि तिचा मराठीशीं असलेला निकटचा संबंध नाकबूल करीत नाहीत. अहिराणी भाषेच्या बाबतींत आपणांस तिचें मराठीशीं असलेलें नातें प्रस्थापित करावें लागलें. गुजरातीशीं तिचा जोडलेला संबंध कसा दूरान्वयाचा आहे व मराठीशीं संबंध कसा सान्व-

याचा आहे हें दाखवावें लागलें. तसा प्रयत्न कोंकणीच्याबाबत करण्याची जरूरी नाही. तेव्हा हा प्रश्न फार सोपा आहे. मराठीशीं तिचें जवळचें नातें सर्वांना मान्य आहे.

## कोंकण– समाज व भाषा

२२. अर्वाचीन मराठी म्हणून जी भाषा मध्यमहाराष्ट्रांत बोलली जाते तिच्या आदिम अवस्था दोन: एक अहिराणी, वऱ्हाडी, गंगथडी इत्यादि विदर्भाच्या परिसरावर चालू असलेल्या भाषांनी निर्देशिलेली आणि दुसरी कोंकणी, अर्वाचीन कालच्या मध्यमराठीची ज्येष्ठ बहीण म्हणून आम्हीं उल्लेखिलेली. ह्याला भाषाशास्त्रीय आधार दाखवितां येतील. जुन्या इंडो-आर्यन भाषेचा कोठे खरा अवशेष सांपडत असेल तर तो लिथ्यूनियन भाषेंत सांपडतो असें म्हणतात. द्राविडी भाषेचे खरे अवशेष कोठे सांपडत असतील तर ते बलुचिस्थानाच्या परिसरावरील डोंगरखबदाडींत वावरत असलेल्या ब्राहुई भाषेंत सांपडतात असें म्हणतात. त्याप्रमाणे माहाराष्ट्रीअपभ्रंश ह्या भाषांपासून उत्पन्न झालेल्या आद्यमराठीचीं कांही प्रतीकें कोठे सांपडत असतील तर दक्षिण कोंकणच्या भाषेंत सांपडतात. ह्याला पुरावाहि मिळतो. वर्णप्रत्यय-शब्दसमूह इत्यादि क्षेत्रांतील सद्यःकालीन दक्षिणी कोंकणी भाषेच्या खुणा, विशेष हे मराठी ज्या प्रांतांत जन्मास आली त्या प्रांतांत उपलब्ध होणाऱ्या अत्यंत प्राचीन अशा शिलालेखी आणि पत्र-लेखी वाङ्मयांत सांपडतात. यादवकालीन शिलालेखी वाङ्मय, महानुभावपंथी वाङ्मय, विवेक-सिंधुभावार्थदीपिकादि नाथपंथी वाङ्मय, अभंग, उखाहरणादि नारायणपंथी वाङ्मय ह्या सर्व वाङ्मयांत जे जे भाषिक विशेष आढळतात ते आणि कारवारगोमंतकादि प्रांतांत सध्या प्रचारांत असलेल्या भाषेंत जे भाषिक विशेष आढळून येतात ते, असे दोन्ही भाषिक विशेष पडताळून पाहण्यासारखे आहेत. दोहोंच्या तुलनात्मक विचाराने आमच्या म्हणण्यास पुष्टि येते. मराठी भाषेचे हे जुनेपुराणे विशेष इतके दिवस अखंड सांपडण्याचीं कारणें कांहीहि असोत प्राचीनरूप आढळतें हें खरें. कोंकणांतील समाजांत उत्तरेकडील आभीर येऊन मिसळले म्हणून त्यांच्या अपभ्रंश भाषेचे प्राचीन अवशेष कोंकणी भाषेंत आढळतात. सारस्वत ब्राह्मणांचा समाज हा उत्तरेकडून-सरस्वतीदृषद्वतीचीं खोरीं, किंवा कान्यकुब्ज अथवा द्वारका, किंवा त्रिहोत्रपूर–कोठून तरी आला; म्हणून त्यांच्या मूळ शौरसेनी किंवा माहाराष्ट्री किंवा मागधी ह्या भाषांचे अवशेष ह्या कोंकणी भाषेंत आढळतात. दंडकारण्याच्या वसाहतकालाच्याहि पूर्वी कदाचित् कोंकण वसलें असल्याचा संभव आहे. नाग, राष्ट्रीक, महाराष्ट्रीक वगैरे लोकांच्या माहाराष्ट्री भाषेचे अवशेषहि कोंकणी भाषेंत आढळतात. ह्या भाषेची मजा अशी आहे की कांही कांही अवशेष हे त्या भाषेचें प्राचीनत्व दर्शवितात. मराठीचें प्राचीन आद्यरूप आणि कोंकणी भाषेचें आधुनिक रूप ह्यांत कांही बाबतींत साम्य आहे.

(२३) ह्या सिद्धान्ताबरोबर आणखीहि कांही ज्या वादग्रस्त बाबी प्रचलित होऊं पाहत आहेत त्यांचा विचार करणें व एकंदर भाषिक विचारसरणींत त्यांचें स्थान नक्की करणें अत्यंत जरूर आहे. कोंकण हें देशनाम व कोंकणी हें भाषानाम ह्या दोहोंबद्दल एकमत नाही. कोंकण हें देशनाम उत्तरेस शूर्पारक क्षेत्राच्या वरील वैतरणी नदीपासून तों थेट दक्षिणेस कोणकोण-पर्यंतच्या मधील प्रदेशास अनुलक्षून आहे असें धरल्यास तेथील भाषेसच "कोंकणी" ह्या भाषानामाने संबोधणें योग्य आहे. परंतु प्रचारांत मात्र अशी स्थिति येऊं पाहत आहे की दक्षिण कोंकणच्या दक्षिणच्या टापूंतील गोवें प्रांतांतील बोलीसच फक्त कोंकणी असें म्हणतात.

उत्तरेस शूर्पारक वैतरणी, दक्षिणेस कोणकोण, पूर्वेस सह्याद्रि, पश्चिमेस समुद्र अशा चतुस्सीमेने अलंकृत असा जो प्रदेश तो कोंकण होय. त्या विस्तीर्ण प्रदेशाचें उत्तरकोंकण, मध्य-कोंकण दक्षिणकोंकण असे स्थूल तीन भाग पडतात. अशा ह्या विस्तीर्ण प्रांतांत थोडया फार फरकाच्या किती तरी बोली प्रचलित आहेत. त्या सर्वांचा मध्यमराठीशीं संबंध अगदी उत्तान रीतीने दृष्टीस पडतो. ह्या बोलींपैकी कांही ज्ञातिनिष्ठ आहेत, तर कांही ग्रामनिष्ठ आहेत कांही गणानिष्ठ आहेत तर कांही व्यवसायनिष्ठ आहेत. प्रथम उत्तरकोंकणांतील बोली पाहिल्या तर दहा निरनिराळ्या बोली रूढ असल्याचें आढळेल. वैतरणी नदीपासून अलिबागेपर्यंतचा टापू उत्तरकोंकण म्हणून समजतात. ह्या उत्तरकोंकणांत १ कोळी, २ कोळवणी, वारली कोळी, ३ डुबल, ४ कैकाडी, कातवडी, ५ आगरी, ६ भंडारी, ७ सामवेदी (हलो) ब्राह्मण, ८ शुक्लयजुःशाखीय पळशीकर ब्राह्मण, ९ बाटलेले खिस्ती, १० पाताणे प्रभु इत्यादि सामाजिक घटक असून त्या प्रत्येक समाजघटकाची बोली परस्परांच्या बोलीपासून भिन्न आहे.

२४. मध्यकोंकणची मर्यादा अलीबागेपासून राजापुरापर्यंत आहे. ह्या मध्यकोंकणप्रांतांत १ बेने इस्राअील, २ बाणकोटे, ३ दालदी, ४ मराठे, ५ कुणबी, ६ चित्पावन ब्राह्मण, ७ संगमेश्वरी वाणी, ८ कऱ्हाडे ब्राह्मण इत्यादि जातींचे लोक राहत असून त्या प्रत्येक जातीच्या बोली परस्परांहून थोडयाफार भिन्न आहेत. बाणकोटी, दालदी, चित्पावनी, संगमेश्वरी, कऱ्हाडे मराठी अशा निरनिराळ्या बोली कांही ज्ञातिनिष्ठ तर कांही ग्रामनिष्ठ मध्य-कोंकणांत रूढ आहेत. अलीबाग रोहें ह्या भागांत बेने इस्राइल (ज्यू) लोकांची वस्ती फार जुनी–१५०० वर्षांच्या पूर्वीची आहे व त्या जमातीने मराठी भाषा अगदी पूर्णपणें आत्मसात् केली आहे. दालदी हे लोक इ. सनाच्या दहाव्या शतकांत (इ. स. ९२३) इराणांतून कार्मीलियन बंडाला त्रासून कोंकणांत आले. दालद्यांच्या भाषेंत आणि बाणकोटी भाषेंत फारसा फरक नाही. कऱ्हाडे ब्राह्मणांची कोंकणांतील वसाहतहि फार जुनी–सुमारें ७०० वर्षांपूर्वीपासून असावी. घाटावरील देशस्थ ब्राह्मणांची ही एखादी शाखा असावी. चित्पावनी ब्राह्मणांची वसाहत त्यांच्याहिपेक्षा फार प्राचीन काळची आहे. चित्पावनी लोक हे बाहेरील कोणत्या तरी देशांतून येऊन कोंकणांत स्थायी झाले असावे असें आम्हांस वाटत नाही. हा समाज उत्तरहिंदुस्थानांतून केंव्हा तरी–दण्डकारण्याच्या वसाहतकालांत–खाली पश्चिम मार्गाने येऊन कोंकणांत वसला असावा. मद्रासेकडील नंबुद्री ब्राह्मणांची वसाहत, कारवार गोवेंकडील सारस्वत ब्राह्मणांची वसाहत, व कोंकणांतील चित्पावन ब्राह्मणांची वसाहत ह्या तिन्ही वसाहती उत्तरेकडील आर्य ब्राह्मणांच्या शाखांनी केल्या असाव्यात. समाज, संस्कृति, गृह्यसंस्कार, धार्मिक समजुती व मतें, अन्नपोषाखादि बाबी इत्यादि सर्व बाबतींत हे तिन्ही समाज आर्य ब्राह्मणसमाजाच्या इतर ज्या शाखा आहेत त्यांच्याशीं समरूप किंवा एकरूप आहेत. हा समाजशास्त्राचा विषय असल्यामुळे आम्ही फारसा सूक्ष्म विचार केला नाही. मध्यकोंकणांतील सर्व बोली ह्या मराठीशीं संलग्न आहेत हें उघड उघड प्रतीत होतें.

## दक्षिणकोंकणांतील समाज

२५. ह्या मध्यकोंकणच्या दक्षिणेकडील भाग दक्षिणकोंकण समजतात. राजापूरच्याखाली देवगडपासून गोव्यांतील कोणकोणपर्यंतचा प्रदेश ह्या टापूंत येतो. ह्या प्रांतांत भट, ब्राह्मण, मराठे, गावडे, कलावंत, देवळी, शूद्र, कोळी, खिस्ती, मुसलमान, नाईते, चाडये इत्यादि जातींची

वसती आहे. ह्या प्रांतांतील मूळची वसाहत कोळ्यांची. ह्याबद्दल दोन तर्क संभवतात. एक तर ते मूळचे तद्देशीय असले पाहिजेत. मूळचे असतील तर द्राविड मानववंशापैकी असले पाहिजेत. बाहेरचे असतील तर आर्यवंशी शूद्रांपैकी असतील. त्यांना द्राविडवंशी समजलें तर स्वभावरचना, शरीराची ठेवण, आचारविचार, संस्कार, भाषा वगैरे बाबतींत इतर प्रांतांतील वारली, कोळी, कातोडी, कातकरी वगैरे समाजघटकांशीं त्यांचा मेळ बसत नाही. तेव्हा ते आर्यवंशीय शूद्र, अतिशूद्र असले पाहिजेत. त्यांच्यावरील थर म्हणजे अतिशूद्र आणि मराठे यांच्यामधील समाज. हा आभीर, नाग वगैरे उत्तरेकडून आलेल्या लोकांच्या मिश्रणापासून बनला असावा. त्यांच्यावरचा थर मराठे· हे अर्थात् महाभारतकालीं किंवा त्याच्या पश्चात् तेथे येऊन वसले असावेत. त्याच्याहि पुढच्या कालांत मध्यमहाराष्ट्रांतून निरनिराळ्या वेळीं तेथील ब्राह्मण, मराठा कुटुंबें तेथें जाऊन वसलीं असावींत. गावडे, कलावंत, देवळी हे समाज धंद्यांवरून निराळे गणिले आहेत. गावडे हे कुणब्यांपैकी आहेत. तसेंच गोपगवळी हाहि समाज धंद्यावरूनच अलग झाला. नाचणेंगाण्याच्या धंद्यावरून कलावंतांचा वर्ग निराळा झाला. देवाची सेवा करण्याच्या धंद्यावरून देवळी-मुरळ्यांचा समाज अलग झाला. खिस्ती, मुसलमान, नाईते हे मूळचे कोळी किंवा गावडे; परंतु पोर्तुगीज, टिपू वगैरेंच्या धर्मप्रसाराच्या प्रयत्नाने खिस्ती किंवा मुसलमान बनले. नाईते हे तर व्यापारासाठी इराणांतून आलेले महमदीय लोक होत. तेव्हा हे मानवशास्त्राच्या दृष्टीने निराळे समाजघटक नव्हत. ह्यांशिवाय राहिले वरचे दोन वर्ग—भट व ब्राह्मण ह्यांचे. ह्यांपैकी गोव्याकडे आपल्याइकडील पंचद्रविड ब्राह्मणांस 'भट' ही संज्ञा आहे. ह्या संज्ञेवरून त्यांच्या वसाहतीची कल्पना येते. 'ब्राह्मण' ही संज्ञा 'सारस्वत' समाजास फक्त लागू आहे. 'भट' ह्या संज्ञेवरून स्पष्ट आहे की हा समाज अन्याश्रयी वृत्तीचा आहे. ब्राह्मण किंवा क्षत्रिय यजमानाच्या घरचीं ब्रह्मकर्में करणें, देवस्थानांचीं पूजनकर्में करणें, यजनहवनादि कर्में करणें हें त्यांचें काम आहे. गोव्याकडील बऱ्याचशा प्रसिद्ध व सार्वजनिक देवस्थानाचे पुजारी हे पंचद्रविडापैकी आहेत. हे पंचद्राविड ब्राह्मण किंवा भट हे इतर प्रांतांतून बऱ्याच उत्तरकालीं गेले असले पाहिजेत. पंचगौड किंवा इतर क्षत्रिय मराठे ह्यांची वसाहत झाल्यानंतर ते कोंकणांत जाऊन वसले असले पाहिजेत. शेवटीं राहतां राहिला समाज सारस्वत ब्राह्मणांचा. ह्यांची वसाहत कोंकणांत केव्हा झाली हें निश्चित रीतीने सांगतां येत नाही· सारस्वत समाजाच्या आगमनासंबंधी बऱ्याच आख्यायिका प्रचलित आहेत. दरभंगा, बिहार प्रांतांतील तिर्भुक्ति किंवा त्रिहोत्रपूर (सध्याचें त्रिर्हुत) गांवाहून कोंकणदेशीय राजाने यज्ञासाठी होतृब्राह्मण म्हणून त्यांना आणविलें; किंवा कान्यकुब्जाहून रामेश्वरास जातांना कोंकणच्या सृष्टिसौंदर्याने मोहित होऊन तेथेंच ते स्थायी झाले; किंवा काठेवाडांतील द्वारका—कुशस्थल—हून ते गोव्यांत आले किंवा अहिच्छत्राहून मयूरवर्माकदंब किंवा त्याचा नातू शिखिवर्माकदंब राजाने त्यांना कोंकणांत आणिलें; किंवा बंगाल देशांतील वारेंद्रसेनी व राऱ्हीआसेनी ह्या ब्राह्मणसमाजापैकी असून तेथून ते कोंकणांत आले. अशा ह्या पांच आख्यायिका रूढ आहेत. दक्षिणेकडील सारस्वत हे उत्तरेकडील आर्यब्राह्मणसमाजापैकीच आहेत ह्याबद्दल शंका नाही. मात्र ते कोठून कोंकणांत उतरले हा प्रश्न आहे. हा प्रश्न उलगडण्यास उपयोगी पडणारा ठाम पुरावा अद्याप उपलब्ध नाहीं. शिवाय तें काम आमच्या प्रस्तुत कार्यक्षेत्राच्या बाहेरचें आहे. उत्तरेकडील दृषद्वती, सरस्वती ह्या नद्यांच्या आसपासच्या प्रांतांतील हा समाज असावा असें मानण्याकडे प्रवृत्ति होते. समाजसंशोधन व धर्मशास्त्रसंशोधन ह्यांचा हा विषय आहे. गौड सारस्वतांत पोटभेदहि आहेत. आद्य गौड कुडाळ-

देसकर, बारदेसकर, साष्टीकर, वालावलकर असे ग्रामनिष्ठ भेद आहेत. इतरहि सूक्ष्म भेद आहेत. ह्यांतील साष्टीकर ह्या वर्गाला कोंकणे अशी संज्ञा दिली जाते किंवा ती ते घेतात. ह्या साष्टीकर सारस्वतांची भाषा ती कोंकणी असें ओघानेच म्हणणें भाग पडतें.

## कोंकणी भाषा

२६. दक्षिणकोंकणातील समाजघटक येथवर सांगितले. ह्या सर्व घटकांची भाषा मात्र मराठी. हिलाच अलीकडे कोंकणी हें नांव रूढ आहे. प्रांतावरून नांव द्यावयाचें झालें तर हिला 'गोंयची'—गोवें प्रांताची—भाषा असेंच नांव द्यावें लागेल. कोंकणी हें नांव कोंकण-प्रांतांतील—म्हणजे कारवारपासून सोपाऱ्यापर्यंत—सर्व भाषेला लागेल. तें नांव एकट्या दक्षिण-कोंकणच्याच भाषेला दिलें तर संभ्रम उत्पन्न होईल. राजापूरपासून कारवारपर्यंतच्या भाषेला पूर्वी कोंकणी हें नांव दिलेलें सतराव्या शतकांत आढळतें. प्राचीन काळीं व अलीकडे देखील ह्या भाषेला 'गोंयची' हें नांव रूढ आहे. कोंकणी हें नांव केव्हा दिलें गेलें असावें ! बीम्स ह्या विद्वान गृहस्थांनी लिहिलेल्या ग्रंथांत ह्या भाषेचा निर्देश मराठी म्हणूनच केला आहे. बीम्सचा ग्रंथ १८७५ च्या सुमारास लिहिला गेला. त्याने जरी ह्या भाषेला कोंकणी असें नांव दिलें नाही तरी खिस्तपुराणाचा कर्ता ह्या प्रांतिक भाषेला कोंकणी असें म्हणतो. त्याने ह्या भाषेचें व्याकरण लिहिलें आहे (इ. स. १६४० Grammatica da Lingua Concani). खिस्तपुराण हा ग्रंथ इ. स. १६१६ मध्ये लिहिला गेला आहे. ह्याने कोंकणी शब्दकोशहि एक लिहिला आहे. फादर स्टीफन्स हा आपल्या खिस्तधर्ममताच्या ग्रंथांत ह्या भाषेला "ब्रामण कानारींची भाषा" (Lingua Bramana Kanarim) असें म्हणतो. ह्या ग्रंथाचा काळ १६३२ हा आहे. ह्या शब्दप्रयोगांतील 'कानारी' ह्या शब्दाचा अर्थ निश्चित करणें कठीण आहे. 'कानडी ब्राह्मण' असा ह्याचा अर्थ आहे काय ! असा असला तर हे कानडी ब्राह्मण कोण ! हे सारस्वत समजले तर हे कानडी कसे ! हे कानडी समजले तर 'कानडा' प्रांतांतून आले काय ! व ही कोंकणी भाषा कानडीपासून उद्भवली कीं काय वगैरे मुद्दे अनिर्णितच राहतात. आमच्या मतें Kanarim किंवा Canarina ह्या शब्दाचा आणि कानडीचा कांही संबंध नसावा. गोंयची ही भाषा कानडपासून उद्भवली नाही हें अगदी स्पष्ट आहे. मंगळूर-कारवार ह्या प्रांतांकडील गोंयची भाषेवर कानडी भाषेचा फार परिणाम झाला आहे. 'नंबूनाका, हांवताका नंबूना' ह्या वाक्यांत नंबू हा कानडी शब्द आहे. 'कुड्ले यो' ह्यांतील कुड् हा शब्द कानडी आहे. असे कानडी शब्द व कांही कानडी प्रत्यय वापरांत आले असले तरी ह्या भाषेस कानडीउद्भव म्हणणें सुतरां अशास्त्रीय आहे. तर मग ह्या कॅनारी शब्दाची उपपत्ति काय ! ह्याचा निर्णय करण्यास एक पुरावा उपलब्ध आहे. इ. स. १८२४ सालीं एका Concalo Teixeira Pinto ह्या न्यायाधिशाने Memorias Sobre as Possessoco Portuguesas na Asia (Treatise on the Portuguese Possessions in Asia) ह्या नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत तो म्हणतो—"In Goa, the Portuguese arriving from Europe are called Fringes. Their sons who are born in India are called Caslisos. The sons born of Portuguese fathers and Indian mothers are called Mesticos. The sons of Indian parents are called Canarins and the gentiles are called Conconos." ह्या उताऱ्यावरून कॅनारी ह्या शब्दाचा संकेत नीट समजतो. बाट-

लेल्या खिस्ती आईबापांच्या प्रजेला कॅनारी असें म्हणत. व त्यांच्या भाषेला Lingua Canarina असें म्हणत. शिष्ट समाज 'कोंकणे' ह्या नांवाने संबोधला जात असे ही आणखी एक गोष्ट ह्या उताऱ्यावरून सिद्ध होते. त्या प्रांतांतील शिष्ट समाज जो 'कोंकणे' त्याची भाषा ती कोंकणी अशा मार्गाने हा शब्द रूढ झाला आहे. हा 'कोंकणे' लोकांचा समाज शिष्ट, विद्वान, कर्तबगार, अधिकारी व उच्च असा असल्यामुळे त्यांच्या भाषेला त्यांनी दिलेलें नांव हेंच त्या भाषेला रूढ झालें व तेंच कागदोपत्रीं नोंदलें गेलें व जुनें 'गोंयची' हें नांव मार्गे पडलें.

२७. ह्या कोंकणी भाषेचा विस्तार मोठा आहे. राजापूरपासून कारवारपर्यंतच्या विस्तृत क्षेत्रांत एकस्वरूपाची भाषा बोलली जाणें शक्य नाही. ह्या प्रांतांत कोंकणी भाषेचीं तीन चार स्वरूपें वापरांत आहे. १ कुडाळी, २ मालवणी व ३ बारदेशकरी असे कोंकणीचे तीन प्रकार आहेत. किंवा गोवें वगैरे मध्यप्रांतांत एक भेद; सावंतवाडी, पेडणें, डिचोली वगैरे ठिकाणीं दुसरा भेद व कोणकोण, कारवारच्या बाजूस तिसरा भेद असे तीन भेद रूढ असल्याचें सांगतात. उत्तम अस्सल कोंकणी भाषेचा नमुना साष्टीप्रांतांत तिस्वडच्या आसपास बोलला जातो. कोंकणी भाषेचे वर सांगितलेले तीन भेद हे फार स्थूल स्वरूपाचे आहेत. सूक्ष्म भेद पाहिले तर वीस आहेत. गोव्याच्या हिंदूंची कोंकणी, गोव्याची खिस्ती कोंकणी, सारस्वतांची कोंकणी, कानडा व चित्रपूर येथील सारस्वतांची कोंकणी, मंगलोरकडील खिस्ती कोंकणी, उत्तरकानडाकडील खिस्ती कोंकणी, ह्या त्या विसांपैकी मुख्य होत. कोचीन कोंकणी, गोमंतकी, गावडी, खिस्ती, बारदेशकरी, दाल्दी, कुडाळी, सांवतवाडी, चित्रापुरी ह्या आणखी कांही सूक्ष्म भेदाच्या बोली आहेत. खानदेशांत ज्याप्रमाणे भाषांचें जाळें पसरलें आहे तसेंच कोंकणामध्येंहि भिन्न भिन्न भाषांचें एक जाळेंच पसरलें आहे. कोंकणप्रांत हा समुद्रकिनाऱ्यालगत असल्यामुळे परकीयांच्या वसाहतीस अत्यंत सुलभ आहे. व्यापार, प्रवास, राज्यतृष्णा, धर्मच्छल, भटकेपणा वगैरे निरनिराळ्या प्रवृत्तींनी प्रेरित होऊन कित्येक परकी लोक कोंकणच्या किनाऱ्यास लागून तेथे वस्ती करून तेथील समाजांत एकरूप जाहले आहेत. ह्यामुळेंच भाषावैविध्य इतक्या थरास जाऊन पोहोचलें आहे. परकी लोकांच्या भाषांचा सरमेसळहि फार झाली आहे. शब्द, उच्चार, प्रत्यय, प्रयोग व वाक्प्रचार ह्यांबाबत निरनिराळ्या लकबा तिच्यांत आल्या आहेत. कानडी, मल्याळी, पोर्तुगीज, उर्दू, पार्शियन, इत्यादि भाषांचा पुष्कळ परिणाम ह्या प्रांतिक बोलीवर झाला आहे. गोव्याच्या कोंकणींत एकदशांश शब्दसमूह पोर्तुगीज भाषेंतील आहे असें Dalgado म्हणतो. कानडा येथील कोंकणींत कानडी शब्दांचा भरणा एकदशांपेक्षाहि अधिक आहे. दाल्दी व नाइते लोकांच्या भाषेंत उर्दूपार्शियन शब्दांचा भरणा आहे. परंतु अशा प्रकारच्या बाह्य बांडगुळांनी मूळ भाषावृक्षाचें स्वरूप कांही विशेष पालटलें नाही. मूळ बुंधा मराठीच आहे.

२८. कोंकणीभाषकांची संख्या निश्चित करणें कठीण आहे. शिरोगणतींत एखाद्या भाषेच्या भाषकांची गणती जितकी निश्चित व खरी असावयास पाहिजे तितकी असत नाही. त्यांत पुन्हा कोंकणी भाषेच्या बाबतींत ब्रिटिश, पोर्तुगीज ह्या दोन राजसत्तांचा संबंध येतो. शिवाय सावंतवाडी, कोचीन वगैरे संस्थानांचा हात त्यांत आहेच. त्या प्रांतांतील भाषांचें वर्गीकरण अद्याप ठाम झालें नाही; ग्रामभाषा, ज्ञातिभाषा, व्यवसायभाषा इत्यादींबद्दलचा खोटा किंवा खरा अभिनिवेशहि निश्चित शिरोगणतीस अडथळा करतो.

कोंकणी भाषा बोलणाऱ्या समाजाची शिरोगणती पंधरा लाखांवर आहे. कारवारी सारस्वतसमाज चौदा पंधरा हजारांजवळ जवळ आहे. बाकी सर्व समाज तद्देशीय लोकांचा. त्यांत

कुडाळी भाषा बोलणारा समाज-कुडाळ, मालवण, सांवतवाडी, रत्नागिरी धरून-पांच लाख आहे. दाल्दी भाषा बोलणारा समाज तेवीस हजार आहे. चित्पावनी बोलणारा समाज पांसष्ट हजार, गोंयची बोलणारा गोव्यानीज समाज चोवीस हजार दोनशे चौऱ्याहत्तर आहे. कोंकणी भाषा बोलणारा समाज पांच लाख आहे. पोर्तुगिज प्रांतांतील समाजाची लोकसंख्या पांच लक्ष साठ हजार आहे.

## कोंकणी मराठी

२९. मराठी भाषा व तिचे प्रांतिक भेद ह्यांचा परस्परसंबंध अधिक स्पष्ट होण्याकरिता खाली तक्त्यांत त्यांची मांडणी केली आहे. ह्या मांडणीवरून पोटभाषांचा मूळ मध्य-भाषेशीं असलेला संबंध तर स्पष्ट होईलच परंतु त्या त्या पोटभाषांच्या उत्पत्तीच्या कालाचीहि कांही थोडीशी कल्पना येईल. प्राकृत अपभ्रंशांचा अस्त झाल्यानंतर नवीन भाषिक संधिकालांत मराठी भाषेच्या घटनेस सुरवात झाली. त्या वेळीं आदिम मराठी भाषेपासून जे दोन प्रकार रूढ झाले तेच कोंकणी मराठी व मध्यमराठी होत. कोंकणी मराठी ही मध्यमराठीची बहीण खरी परंतु ज्येष्ठ बहीण आहे हें तितकेंच खरें.




(येथे एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती हीं की 'मध्यमराठी' हा शब्दप्रयोग सापेक्ष आहे. मध्यमराठी हा शब्दप्रयोग कालदृष्ट्या वऱ्हाडी, नगरी, पैठणी, वाईप्रांती, पुणेरी अशा निर-निराळ्या प्रांतांतील भाषेला लावितां येणें शक्य नसलें तरी येथे त्याचा प्रयोग जुन्या मराठी-संबंधी- मराठीच्या पहिल्या स्वरूपासंबंधी-केला आहे.)

अर्वाचीन मराठीला मध्यमराठी कोंकणीपेक्षा जवळची आहे. आद्यमराठीच्या कोंकणी व मध्यमराठी ह्या दोन अवस्था आहेत. कोंकणी ही वयाने श्रेष्ठ आहे. परंतु स्वभावविशेष, आत्मा, अस्थिमांस इत्यादि बाबींत दोन्ही भाषांचें साम्य असल्यामुळे भगिनीचें नातें नाहींसें व्हावयाचें नाही. कोंकणीचा मराठीशीं कांही संबंध नाही हें म्हणणें शास्त्र, इतिहास भाषा, संस्कृति ह्यांना धरून होणार नाही.

३०. ह्या सर्व विवेचनावरून खाली दिलेले सिद्धान्त निघतात :—

१ कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा नाही.

२ ती मराठी भाषेचें एक स्वरूप आहे. तिच्यांत मराठी भाषेचें प्राचीन स्वरूप उपलब्ध होत असल्यामुळे अर्वाचीन मराठीपेक्षा तिच्याकडे कालदृष्ट्या ज्येष्ठत्व येतें.

३ कोंकणपट्टींतील सर्व भाषांपैकीं दक्षिणकोंकणांतील भाषेला मिळालेलें "कोंकणी" हें नांव बऱ्याच प्राचीन काळीं दिलें गेलें असावें. सतराव्या शतकांत त्या भाषेला कोंकणी ही संज्ञा प्राप्त झाली होती असें दिसतें.

## कोंकणी भाषेचे नमुने

३१. कोंकणी भाषेचे जे निरनिराळे पोटभेद वर उल्लेखिले त्यांचे नमुने क्रमाने खाली दिले आहेत. चित्पावनी, राजापुरी, कुडाळी, सांवतवाडी, बेळगांवी कोंकणी, गोवें हिंदु कोंकणी, कारवारी इत्यादि भाषाभेदांचे पुढे दिलेले नमुने पाहिले म्हणजे कोंकणी भाषेचें स्वरूप पूर्णपणें ध्यानांत येऊन तें मध्यमराठीच्या रूपाशीं कितपत जुळतें अथवा भिन्न आहे हें समजून येईल. अहिराणी भाषेचें मराठी भाषेशीं नातें सिद्ध करण्याकरता जी भाषिक चिकित्सा करावी लागली ती कोंकणी भाषेच्या बाबत करणें अवश्यक नाही. परस्परनातेंसंबंध उघड उघड आहे. पहिल्या चार पोटभेदांत तर फारसा फरक नाहीच. तीं मराठीचींच स्पष्ट अशीं रूपांतरें आहेत. बाकीच्या इतर भेदांच्या बाबत दोहोंतील भिन्नपणा जाणवतो. तरी पण भाषा मराठीच आहे ह्याबद्दलची जाणीव नाहीशी होत नाही. पुढील नमुने पाहा. पहिला नमुना चित्पावनीचा आहे.

### १ चित्पावनी

"माणसान घे म्हटले आपलेपण सोडूं नये. दुसरेचां चखोट सेलतां घेवां. पण उठले सुटले दुसरेच्या सगळ्योच तऱ्हा घेणा अगदी वाईट. आताशा पुरुष बायको धाकटी बघेवी ती अगदीच आपली शिळपत दिसचत. दिवसान दिवस सगळ्याच गोष्टीञ् भिकारपण नि दुबळेपण वाढत चाललां."

ह्या भाषेचें स्वरूप मराठी आहे हें उघड आहे. उच्चारांपैकीं 'ए' व 'ओ' चा उच्चार कांहीसा आडवा – अ आणि ऐ व ओ ह्यांमधील – आहे. शब्दांच्या रूपांत कोठे कोठे य, ह्य आलेला दिसतो. आकारान्त शब्द ओकारान्त उच्चारतात. एकारान्त शब्द आकारान्त होतात. विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय मध्यमराठींतील सारखेच आहेत. सर्वसामान्य जो नासिक्यउच्चार तो याहि प्रकारांत आढळतो. शब्दांचें सामान्यरूप लक्ष्य आहे.

### २ राजापुरी भाषा

"चेटवा, बाळकेस अंबळ घे. मज बग आज कामांफुडें इवली दिखिल फुर्सत नाय; नि सैपाक लेकर हुइसा हवा. विठा सडेवर गुराँ पोंचवाय गेला, ताव् येईल. ते मी विणी गुंडाळतों, आंगावर पाणी ओततों, नि सैंपाकास लागतों."

हा राजापुरी भाषाविशेष. ह्यांतहि नासिक्य आहेच. नासिक्याबरोबर श्वासमिश्रणहि उच्चारांत विशेष दिसतें. 'इ' ह्या तालव्याचा स्पष्ट अर्धस्वर होतो. गुंडाळतों, ओततों, लागतों हीं स्त्रीलिंगी रूपें लक्ष्य आहेत. द्राविडी भाषेचा परिणाम तर हा नसेल ना !

## ३ कुडाळी

"शिरां रे मार व्हरान् इटयानी माकां जमिन्येक पाट कशी ती लागुंक दित नाय. दिवो मालवलो रे मालवलो की लागले रगात खावूंक. आणि त्याला रे कसलो अुपाय करतलंय ! त्याकां विलाज नाय म्हणान् आपलो उगी होतंय मियां. इतक्यांत तो सकलो कुडोपकार भेटलो आणि त्यांनी बाबा, अेक, उपाय सांगल्यान्. अगदी निजुंच्या वेळेक एक लिंबचो टांक ठेवचो आणि उज्जु ढेकणांच्या टकलेंत मारुंचो. तडफडान् पडता एका मिलटांत. हो उपाय केलंय मातर; आणि अशी झोंप येताहा म्हणतंय ! मुंबईच्या यंकटरावान् काढल्याहान म्हनतात ह्यां यंतीर."

राजापूरच्या दक्षिणेकडील कुडाळी-मालवणी भाषेचा हा नमुना आहे. मालवणी हें नांव मालवण ह्या तालुक्यावरून पडलें. राजापुरी व चित्पावनी ह्या भाषांत मध्यमराठीचे विशेष सांपडतात त्यांपेक्षा ह्या भाषाभेदांत कमी आहेत. 'इ'च्या ठिकाणीं 'य' घालणें, एकारान्त नामें आकारान्त करणें, महाप्राण मिसळणें, वर्णवियोग करणें हे ह्या भाषेचे विशेष आहेत. द्वितीयेचे 'क' व 'का' हे प्रत्यय ह्या प्रांतांतील भाषेपासून सुरू होतात.परंतु कारवारी भाषेंतील पंचमी व षष्ठीचे अनुक्रमें 'थावनु, गेले' हे प्रत्यय ह्या भाषेंत नाहीत. त्यांऐवजीं 'हून, सून, समयसून व चो, ची, चां' हेच प्रत्यय रूढ आहेत.

## ४ सावंतवाडी कोंकणी

"देडशें वर्सा जातीत आमचे पूर्वज गोंयथान आयल्यार हे हांगासर येऊंक पावो गोंयच्या परास हांगा तांकां कामधंदो बरो मेळा. त्या वेळा वाडी भोसल्यांचें राज आसलें आनि ते राजा तांकां बरे भाशेन चलैत तांतले जाय ते जण बरे कसबी आसले आनि थोडे येपारी आसले. येपारी आसले ते गोंयाँयान तुप आनि घाण्यांचें ताजें तेल हाडीत आनि वडियान पानाचो गोंयाँ व्हरत ते संमय वाडीयांत गोंयां वेचांक बरे मारग नसले म्हण म्हाल हाडचो व्हरचो तो सगळो बैला वैल्यान व्हरत."

ह्या भाषाप्रकारांत दक्षिणी कोंकणीचे विशेष आढळतात. नासिक्याचें प्राचुर्य, गोंयथान, आयल्यार, हांगासार, येअुंक, तांकां. आसले, चलैत, तांतले, हाडीत, गोंयाँ, वचोंक वगैरे रूपें अस्सल कारवारी आहेत. मालवणीकुडाळीपेक्षा कारवारी विशेष अधिक आढळून येतात.

## ५ बेळगांव कोंकणी

"एक आराव मानुष्याचो गोडयाचो मोग एक आराव मोनीस चोल गरीब आसुलो त्याचेकडे कैच एक नेशेग आऊ पांगरोक नासुलो. पोन योक जोवोर बोरो गोडो त्याच्याकडे आसुलो तो गोडो विकतो घेऊच्याक एक पोईसोलो मोनीस सोदीतालो. पोन त्याका गोडो विकची बिलकूल पोईली खोशी नासुली. मागीर आवोण चोळ गरीब आसा मोण विकुक कबूल झालो. आनिक आपलो मोगाचो गोडो गेऊन गेलो त्या मनुष्याकडे त्यान्ना ते मनुष्यान चोळ खुशेन त्याला रुपोय मेझोन दिले. ते रुपोय आतान्त गेऊन रुपयाक आनिक आपल्या गोडयाक पोडोइत रायलो आनि मोजक लागलो 'अरे हांव तुका दुसऱ्याच्या आतान्त देता. ते तुका बान्दतोले आनि कोनझाणा तुका मारात अशे दग्द दितले."

## ६ गोवें हिंदू कोंकणी

पुर्विल्या काळांत धर्तरेचे फाटीर काकस्तोन नांवाचो एक देस आसलो. थैचे लोक झुजाचे पाटांगडे आसुन झुजमारे म्हणून घेवपांत तांकां मोटी खोस जाताली. झुज, रणखेंवां आनी हाणामारी हांचे फुडें संवसारांत व्हडविकेची हेर कसलीच करणी आस म्हणपाचें ते नकळ आसले. झुज हीच तांगेली सगळ्यांत व्हटली संस्कृताय आसली. तांगेल्यो बायलो आनी भुरगी लेगीत झुज मारूंक शिंवशिवताली. आवैच्या कुसव्यातसून भुरगे जमनीर पडनाफुड ताचो बापूस तापौन तांबडी वडंग तरवार उदकांत बुडौन तातुतले दोन चार न्हिहविल्ले थेंबे ताच्या तोंडांत गळैतालो आनी ते पोटांत पावतकुच तें भुरगें धिरिष्ट जाता असो कोकस्तानी लोकांचो समज आसलो. भुरगे आठ वर्साचें जायनापुडें मोठ्या समारंभान आनी आख्यापाख्यान् अेक ल्हानशी तरवार ताचे कमरेक खोवन अेक धोणकी ताचे खांकेक उमकळाय ताले आनी ताक खुस्ती मारूंक आनी मारामारी करूंक शिकैताल थैच्या साळांनीं लिखणेपरस तरवार अदिक चलता आनी छायेपरस रगत चड व्हावतालें.

## ७ कारवार सारस्वत कोंकणी

एका गृहस्ताक दोगझण पूत आशिल्ले. तांतुलेपैकी सानु आपणागेल्या बापसुकडे म्होणच्या लागल्लो, 'आण्णाँ मगेल्या वाण्टयाक येवची तितली आस्ती माक्का दी' आनिं तन्नों आपणागेली आस्ती तांकां वाण्टूनु दिली. आनी थोडेचो दिवसांनी सानपूतु आपणागेली आस्ती सर्व एकडे कोरनूं धूरेक गावाँक वच्चू गेलो आनी थ वैट चालीने आपणागेलो पैसो सर्व वाइट केल्लो. आनी सर्व खर्चंना फुडे त्या गावान्तु व्होड दुष्काळु पल्लो, आनी ताक्का गरज पळ्ळी. आनी तो त्या गांवच्या एक गृहस्ताकडे कामाक रावलो आनी तान्ने ताक्का आपणागेल्या गाद्यातु डुक्रांका चराँवच्याक धाल्लो. आनि तो त्या डुक्रांनी खावचो तसलो कुण्डो आवनुं खुशालेने आपनागेले पोट भोरनु घेतलो शिल्लो.

३२. शेवटचे दोन नमुने कारवारी, गोवें कोंकणीचे आहेत. त्यांमध्ये मध्यमराठीपासून निराळे असे कांही विशेष आढळून येतात.

(१) नासिक्यप्राचुर्य, शब्दांचा स्वरान्त उच्चार, महाप्राणाचा उच्चार कमी करण्याची प्रवृत्ति, आरंभींच्या ए, ओ बद्दल ये, वो हे उच्चारणें किंवा विवृत्त उच्चार करणें, मूर्धन्य उच्चारांचे दन्त्य उच्चार करणें, ऊष्म उच्चारांचे दन्त्य उच्चार करणें, 'स' चा उच्चार तालव्य करणें, 'व्ह' उच्चाराचें प्राचुर्य, ए, ओ वगैरे उच्चारप्रक्रियेचे प्रकार आहेत.

(२) कांही नामविभक्तींचीं रूपें उल्लेखनीय आहेत. प्रथमा, तृतीया, पंचमी, षष्ठी, सप्तमी हीं कारवारींत मध्यमराठीच्या रूपांपेक्षा भिन्न आहेत; गोव्याच्या कोंकणींत भिन्न नाहीत. गोव्याच्या कोंकणींत द्वितीया चतुर्थीचेच प्रत्यय क, का हे भिन्न आहेत. कारवारी कोंकणींत प्रथमा, तृतीया, सप्तमीच फक्त किंचितशा मध्यमराठीप्रमाणे आहेत (तु). द्वितीया, पंचमी, षष्ठी ह्यांचे प्रत्यय भिन्न आहेत (क, कां, थावनु, गेले). परंतु त्याहि भाषेंत सामान्यनामांपैकी कांहीना नेहमीचे चो, चीं, चां हे प्रत्यय लागतात. आख्यातविभक्तींत 'लों', ल्ली, ल्लो' चें प्राचुर्य फार आहे. आसलो, जाताली, गळैतालो, न्हिविल्ले, पल्लो, म्हल्ले, घाल्यात, चालैताले हीं भूतकाळाचीं रूपें होत. ह्यांत मध्यमराठीशीं साम्य आहे. भविष्यकाळी रूपेंहि 'ल'-

कारान्त होतात. धातुसाधित नामें वचुनु, खावुनु, खेळणुं, धावनु, वोणु, जेमनु अशीं होतात. पूर्वभूताचीं रूपें गेल्लेले, खाल्लेले, धाविल्ले, पळलेले इत्यादि मध्यमराठीप्रमाणेच आहेत. तुमन्तें वचुक, खानचाक, खळचाक, धावचाक, पडचाक, जेमचाक अशीं 'क'कारान्त आहेत. आज्ञार्थाचीं रूपें मध्यमराठीप्रमाणे वच, वल्लभी, खा, खेळ, धाव उल्ल, खानो, धानो, पाडो, जेवो अशीं होतात. घेतां, असतांना, आवता, थुकता अशी वर्तमानकालवाचक रूपें मध्य-मराठींतीलप्रमाणेच होतात. त्यवन्ताचीं रूपें—तापौन, बुडौन, उरून, करून, वळखून, न्हावन, घेवन, घोडावन, चिड्डून अशीं जुन्या मराठींतील रूपांसारखीं होतात.

(३) शब्दसमूहाच्या बाबतींत ही भाषा पुराणमध्यमराठीच्या जवळ येते. गिरेस्त, म्हन्यान, सारखो, भितर, चाखरमाने, भौ (बहु). काय, वेपार, उन्या, निहाय, पूर्वील, थैचे, पायंवडे, घेवपात, म्हणपाचे, कुसवा, जायनाफुडे, माथेभोगान, जीवाचेर, धनयाच्या, आपणालो वेव्हार, भांगर, कुडींतल्या, म्हणपा, पोटतिडीक, फाडफुडो, जथापथ, काणयो, कुवाडे, कोणाकूच, झुज-मारे, वागोणी, रणखेवा उत्रार, संवसार, सामखार, करणी, वापुय, पावतकुच, येवजना, उज-वाडा, अपुर्वायेन, हावळ वेंथ, बांदणी, इत्यादि इत्यादि हे शब्द अर्वाचीन कोंकणींत हरहमेश वापरांत आहेत. हे जुन्या मराठींत आढळतात. आणखी असले शब्द पुष्कळ आहेत.

ह्या सर्व विचिकित्सेवरून कोंकणीमध्ये जरी कांही भिन्न उच्चारविशेष, प्रत्ययविशेष असले तरी भाषेचें एकुणांतींतील स्वरूप मराठी आहे. तेव्हा मराठीचीच ही शाखा आहे हें निः-संशय आहे. ह्याबद्दल कोणाचें भिन्न मत नव्हतेंच परंतु संभ्रम राहूं नये म्हणून पुनः ह्याची चर्चा केली इतकेंच.

३३. कोंकणी ही स्वतंत्र भाषा नसून ती मराठी भाषेचा एक प्रकार आहे असें आपण मागे पाहिलें. ही भाषा स्वतंत्र जरी नाही तरी तिचें बोली म्हणून महत्त्व विशेष आहे हें आपण विसरतां कामा नये. मराठीच्या इतर प्रांतिक भेदांपेक्षा ह्या प्रांतिक भेदाचें महत्त्व विशेष आहे. ही भाषा बोलतांना ऐकिली तर मध्यमराठी जाणणाऱ्या माणसाला चटकन् बोध होत नाही. अगदी कारवारकडील कोंकणी तर कांही वेळां समजत नाही. तेव्हा मध्यमराठी-पासून ही उच्चारदृष्टया बरीच भिन्न आहे. प्रत्ययप्रक्रियेंतीलहि भेद लक्ष्य आहेत. हे सर्व विशेष लक्षांत घेतां हिचे बोली म्हणून विशेष महत्त्व मान्य करणें प्राप्त आहे. ह्या भाषेंत खिस्ती धर्मोपदेशकांनी पूर्वी वाङ्मयनिर्मिति केली. अलीकडील कालांत कांही थोडीशी त्रुटित निर्मिति झाली आहे. मधील तीनशें वर्षांतील वाङ्मयनिर्मिति अद्याप विशेष उपलब्ध नाही. मराठीच्या इतर बोलींपेक्षां ह्या बोलींत व्याकरणाचें स्थिरत्व अधिक आहे. इतर बोलींच्या इतकी कोंकणी ही सुलभ प्रक्रियाक्षम नाही. त्याशिवाय दक्षिणी कोंकणीभाषकांची-त्यांतल्या त्यांत वरच्या थरांवरील लोकांची संस्कृति उच्च आहे. ती नागरमराठीभाषकांच्या तोडीची किंबहुना अधिक आहे. त्यांची विजिगीषुता, आक्रमणशीलता, स्पर्धा, महत्त्वाकांक्षा, बुद्धिमत्ता, कल्पकता इत्यादि गुणांत कोकणांतील सारस्वतसमाज किंवा कुडाळ मालवणी समाज, किंवा चित्पावनी समाज हा कोणत्याहि इतर समाजांच्या तोडीचा आहे. असें असून त्यांची भाषा ही इतक्या चार पांचशे शतकांच्या दीर्घ अवधींत बोलीच्याच स्वरूपांत राहावी, तिच्यांत उच्च वाङ्मयसृजनशक्ति उत्पन्न होऊं नये ह्याचें आश्चर्य वाटतें. भाषिक उत्क्रांतीच्या दृष्टीने हा एक चमत्कार आहे असें म्हणावयास हरकत नाही. दक्षिणकोंकणच्या समाजांत आत्मप्रकटी-करणाची इच्छा, जोम, प्रवणता, सामर्थ्य असून आपल्या भाषेंत त्यांनी आत्मप्रकटीकरण करूं नये हें आश्चर्य आहे. तें न करतां आजवर थांबले हेंच आश्चर्य आहे. मध्यमराठीभाष-

कांच्या दुराग्रहाने ही त्यांची कुचंबणा झाली हें कारण आम्हांस मान्य होत नाही. ही कुचंबणा आर्थिक परिस्थितीमुळे झाली असावी असें आम्हांस वाटतें. कोणत्याहि भाषेंत वाङ्मयसृजन-सामर्थ्य येण्यास व्याकरणाचें स्थिरत्व, आत्मप्रकटीकरणास लागणारी प्रतिभा व प्रवणता, व आर्थिक स्थिति (वाचकसंख्या) ह्या तीन गोष्टींची आवश्यकता लागते. यांपैकीं कोणती गोष्ट कोंकणी भाषेस नडत असल्यास ती नाहीशी करण्याचा प्रयत्न व्हावा. ह्या दृष्टीने अलीकडे ह्या भाषेंत वाङ्मय निर्माण होऊं लागलें आहे तें एक सुचिह्न आहे असें आम्ही समजतों व त्या त्या लेखकांचें अभिनंदन करतों. प्रांतीय, जातीय, गण वगैरे कोणत्याहि उपभाषांत वाङ्मय तयार व्हावें असें आम्हांस वाटतें. ह्याने मध्यमराठीचें शोषण न होतां अधिक पोषणच होईल असा आमचा भरवसा आहे. वाङ्मयाच्या वृद्धीस अनुभूतीच्या केंद्रांची वृद्धि व्हावी लागते. अनुभूतींचीं केंद्रें हीं वाङ्मयाचीं अधिष्ठानें आहेत. तीं जितकीं वाढतील तितकें वाङ्मय वाढेल इतकेंच नव्हे तर त्या वाङ्मयाची हांक दूरवर जाईल. निरनिराळ्या समाजांतील घटकांना त्यांच्या त्यांच्या बोलभाषेंत स्पर्श करील असें वाङ्मय निघालें पाहिजे. वाङ्मय हें केवळ नागरसंमर्शीच असून उपयोगी नाही, तर तें जानपदसंमर्शी असलें पाहिजे. त्याची हांक समाजाच्या पृष्ठभागा-वरील सुखासीन माणसालाच तेवढी पोहोंचली पाहिजे असें नसून समाजाच्या तळाशीं असलेल्या त्रस्त अशा भूभिजनांपर्यंत ती गेली पाहिजे. ह्या दृष्टीने कोणत्याहि उपभाषेंत अथवा बोलींत वाङ्मयनिर्मिति व्हावी असें आम्हांस वाटतें. मात्र व्याकरणस्थिरत्व, आत्मप्रकटीकरणास लाग-णारी प्रतिभा, व आर्थिक परिस्थिति अशा तीन मर्यादांनी अंकित असा हा वाङ्मयीन प्रयत्न व्हावा.

३४. कोकणी भाषेसंबंधी आमचे सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहेत: —

१ कोकणी भाषा ही स्वतंत्र भाषा नसून ती मराठीची एक शाखा आहे. तिच्यांत मराठी भाषेचें प्राचीन स्वरूप उपलब्ध होत असल्यामुळे अर्वाचीन मराठीपेक्षा तिच्याकडे काल-दृष्टया ज्येष्ठत्व येतें.

२ कोंकणपट्टींतील सर्व भाषांपैकीं दक्षिणकोंकणांतील भाषेला 'कोंकणी' हें नांव प्राचीन कालापासून रूढ आहे, त्या अर्थी तेंच नांव त्या भाषेला दिलें जावें. कोंकणपट्टींतील इतर भाषा उत्तर कोंकणी म्हणून समजाव्या किंवा ज्ञातिनिष्ठ, ग्रामनिष्ठ जीं नांवें प्रचलित आहेत तींच चालू राहावीं.

३ कोंकणीभाषकांची शिरोगणती स्वतंत्र व इतर मराठीभाषकांच्या संख्येशीं सामावून अशी दुहेरी व्हावी. त्यांचा समावेश मराठीभाषकांमध्ये व्हावा. कारण कोंकणी ही मराठीचीच एक शाखा आहे.

४ कोंकणी भाषेंत वाङ्मय निर्माण करण्याविषयी प्रतिभासंपन्न कोंकणीभाषकांस आमची शिफारस आहे.

---

## कोंकणी-अहिराणी भाषांसंबंधी आमचे निर्णय

### १ अहिराणी :

ज्या अर्थी

(अ) अहिराणी भाषेंत मराठी गुजराथी शब्दांचें प्रमाण १००:४१ असें आहे;

(आ) नामविभक्तींपैकी संबोधन, प्रथमा, द्वितीया (सप्रत्यय, अप्रत्यय), चतुर्थी, तृतीया, पंचमी, सप्तमी ह्या मराठी आहेत. फक्त षष्ठी विभक्ति गुजराती दिसते;

(इ) आख्यातविभक्तींपैकी वर्तमान, भूत, भविष्य, आज्ञार्थ, अकरणरूप हे प्रकार मराठी आहेत. ल्यवन्त हें गुजराती आहे. अस्तिवाचक संधि-क्रियापद "से" हें गुजराती आहे;

(ई) वाक्प्रचार मराठी आहेत;

(उ) वर्णप्रक्रियेंत मराठी उच्चार प्रामुख्याने दिसतात;

त्या अर्थी

अहिराणी भाषा ही मराठी भाषेची उपभाषा समजावी व अहिराणीभाषकांची शिरोगणती मराठीभाषकांत समाविष्ट केली जावी.

### २ कोंकणी :

ज्या अर्थी

(अ) कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा नसून मराठीची एक शाखा आहे. तिच्यांत मराठी भाषेचें प्राचीन रूप उपलब्ध होत असल्यामुळें अर्वाचीन मराठीपेक्षा तिच्याकडे कालदृष्ट्या ज्येष्ठत्व येतें;

(आ) दक्षिण कोंकणी भाषेला "कोंकणी" हें नांव प्राचीन कालापासून रूढ आहे.

त्या अर्थी

दक्षिण कोंकणी भाषेस "कोंकणी" ही संज्ञा देऊन कोंकणीभाषकांचा समावेश मराठीभाषकांत व्हावा. त्याची शिरोगणती स्वतंत्र व मराठीभाषकांत सामावून अशी दुहेरी व्हावी.

मुंबई,
ता. १५-४-३८

ना. गो. चापेकर (अध्यक्ष)
कृ. पां. कुळकर्णी
वि. ह. निजसुरे
चिं. ग. कर्वे (चिटणीस)

अनुक्रमणिका

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चाफेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता ना. गो. चाफेकर यांनी प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका